सरदार इब्राईमखान मोठा धारकरी लष्करचा हजारी बराबर होता त्यांणीं खस्त मेहनत करून फोंड घेऊन, कडवाड, सिद्धेश्वर, मिरज, आमलें, कदरें, सुपें, उडखडें, अकोट घेतले. वरकड वरघांटचे कोटही घेतले. गोकर्ण महाबळेश्वर सावर्दे येथवर सरदें[२३] लाविली. गोंवेचे फिरंगी यांस दबावून, त्यांजवळून तोफा नक्त जड जवाहीर घेऊन, आपलेसें करून, त्यांस उदमाचा कौल देऊन आमदरफ्ती करावयास निरोप दिला. या प्रकारें सर्व कोंकण काबीज केलें. बिदनुरी शिवाप्पा नाईक राजा होता त्याचें शहर बसनूर म्हणोन थोर नामांकित समुद्रकिनारीं होतें. तेथील पालत आणवून घांट माथेवर जाऊन पहातां मार्ग नाहीं सबब जहाजें आणवून त्यांत बसोन एकाएकीं त्या शहराजवळ सूर्योदयाचे समयीं गेले. लोक बेफाम पाहून शहर मारिलें. एक दिवसांत लुटून फन्ना केलें. जशी सुरत मारून माल आणिला त्याप्रमाणेंच मालमत्ता आणिली. ती घेऊन देशीं आले. एकंदर मालाचा अजमास दाहा कोटी होनांचा जहाला.

तदनंतर कारंजकोट मोगलाईंत शहर होतें तेथून पालय आणवून महाराज यांणीं बराबर लष्कर घेऊन चालिले. जातां जातां औरंगाबादेची पेठ मारिलीं. व ब्न्हाणपूरच्या पेठा मारून पुढें सात गांव मजल करून कारंजियावरि जाऊन तीन रोज मुक्काम केले. सर्व शहरांतील वाडे पाडून खणती लावून द्रव्य काढून जड जवाहीर सोनें रुपें व उंची कापड ऐसें घेऊन स्वारी करून चालले. मोंगलांचे सुभे जागजागां दिलेरखान बहादर व इंद्रमणि ऐसे उमराव फौजेनिशीं होते ते चहूं तर्फेनें चालून आले. युद्ध चाललें. मोठमोठे मोंगल मारून गर्दीस मेळविले. हत्ती घोडे मा हा ल पाडाव करून माघारे घालविले. महाराज सुखरूप देशीं आले. पाठीवरि दिलेलखान मोठा शूर बारा हजार स्वारानिशीं दहा बारा गांवा आंत होता तों महाराज राजगडास येऊन पोंचले. मालमत्तेची संख्या पाहतांच सात कोटीचा आकार जहाला.

पुढें राहिरीगड अदलशाही होता तो घेतला. महाराजांनीं जाऊन पाहिला तों मोठा उत्तम, चहूं तर्फा गडाचे कुबल कडे तासल्याप्रमाणें. दीड गांव. पर्जन्यकाळीं गवत देखील उगवत नाहीं. निघोरधोंडियाचा. दौलताबाद किबहुना पृथ्वीवरि समतुलनेस अतिउत्तमोत्तम किल्ला उंच नेटका तळसुद्धां शोभिवंत, उपमेस दौलताबादही न पावे. ऐसा रमणीक पाहून महाराज बहुत समाधान पावले. तख्तास गड हाच करावा, ऐसा विचार करून ते क्षणीं तेथें घरें वाडे सदरा चौसोपे अठरा कारखाने यांस वेगळालीं, तैशींच राणीवशाचीं घरें पृथक्

---

२३. सरद–हद्द, सीमा.

अनुक्रमणिका

व सरकारकुनांचीं घरें व गजशाला व अश्वशाळा व उष्ट्रशाळा व पालखीचे महाल व [18]वहिली महाल, कोठी व थट्टी[19] महालास व वसनागार, भांडारगृह व एकांत स्थळें, राजसभा, विलासभुवनें, उपरमाड्या व शिकारखाना तयार करून चुनेगची व चिरेबंदी बांधलीं.

महाराजांच्या राण्या पृथक्. त्यांमध्यें मोहिते यांची कन्या सकलसौभाग्यादिसंपन्न सईबाईसाहेब गरोदर होती. त्यांस पुत्र जहाला. तें [ मूल ] पालथें उपजलें. हें वर्तमान महाराजांस समजल्यावरि दिल्लीची पादशाही पालथी घालील असा पट्टुतर प्रतापी जहाला असें बोलोन मनांत पुढील भविष्य कळलें. ज्योतिषी गणक सिद्धांत वेदांतवक्ते ब्राह्मण व महापंडित व ज्ञानी मिळोन पुढील भविष्य वर्तविलें जे, हे थोर प्रतापी होतील. महाराजांनीं नांव राजाराम ठेविलें कीं, राज्यसुख आपणापेक्षां याचा अक्रम व नांवाची कीर्ति होऊन आपलें नांव रक्षील तरि एवढाच रक्षील. ऐसें बोलोन बहुत दानधर्म केला. ब्राह्मणांस संतर्पणें घातलीं. हस्ती भरून साखरा वांटल्या. वाद्यं नानापराचा तुंबळ गर्जना करवून तोफेची सरबत्ती करून मोठा आनंद केला. सरकारकुनांस व सर्व लोकांस वस्त्रें देऊन पुत्रोत्साह संपादिला.

तदनंतर मोरोपंत पेशवे यांणीं त्रिंबकगड घेतला. त्यापासून सालेरी मुलेरी पावेतों कित्येक किल्ले घेतले आणि कित्येक नवे वसविले. कोंकण रामनगर वगैरे देश घेतले. त्या देशांतही गड बांधिले. अशी क्षितीवरी ख्याति केली. ही खबर दिल्लीस पादशहास सविस्तर समजली. आणि सुरत मारिली, सालेरी मुलेरी आदि किल्ले घेतले, खानदेश बागलाण गुजराथ वऱ्हाडदेश घेतला, ऐसें कळोन बहुत दुःखी होऊन अतःपर काय इलाज करावा ? [ असे विचारी पडले. ] तेसमयीं रोहिलखान याचा सुभा रवाना केला तोही नामोहरम होऊन आला आतां शाहाजादा पाठवावा तरि तिकडे मिळोन दिल्लीच घेईल. आपण खुद्द जावें [ तरि ] जातां येत नाहीं. न हू न शास्तीखानासारखें झालिया काय करावें ? शिवाजी राजे जोंपर्यंत जिवंत आहेत तोंपर्यंत दिल्ली आपण सोडीत नाहीं. असा विचार करून येखलासखान व दिलेलखान यांस बोलावून आणून सव्वीस हजार जमावानिशीं जाऊन सालेरी घेऊन फत्ते करणें म्हणोन सांगोन पाठविलें. तैसेंच दिलेलखानास अहिवंत रवळा जवळा येथें दहा हजार स्वारांनिशीं पाठविलें. त्याणीं येऊन रवळा जवळा यास लागले, किल्लेवरून गडकरी यांणीं भारी युद्ध केलेमुळें किल्ले हातीं आले नाहींत. मोरोपंत पेशवे

१८. वहिली महाल–रथशाला, गाडीखाना.

१९. थट्टीमहाल=गोवाटिका, गो-शाला.

यांणीं कुमकेस मावळे लोक १२००० बारा हजार पाठविले. त्यांणीं जाऊन छापा घालून घाबरा केला. रामाजी पांगेरा म्हणोन हशमांचा नाईक हजार लोकांनिशीं जाऊन कणेरागडाखालीं दिलेलखान यांणीं फौजेनिशीं चालोन घेतलें. तेसमयीं पांगेरा यांणीं लोकांस विचारिलें, यांत कोणी यावेळीं निदान करावयाचे सोबती असाल त्यांणीं उभे रहावें. म्हणोन निवड करितां सातशें माणूस निघाले. ते घेऊन पायउतारा चालोन जाऊन चहूंतर्फे वेढोन एकघाई प्रहरभर टिपरी शिमगा खेळ खेळतात तद्वत् लढून बाराशें पठाण रणास आले. व पांगेरा वगैरे इकडील लोकांस एकेकांस वीस पंचवीस तीस जखमा तीर, बरची व सांगा व माडू वगैरे शस्त्रांच्या कहरी लागून मृत्यु पावले. दिलेलखानानीं तोंडांत आंगुली घालून मोठें आश्चर्य केलें, मग येखलासखान यांणीं येऊन सालेरीस शह घातला आणि फौजेसहित तेथें उतरला. हें वर्तमान महाराजांस कळोन कल् लष्करसह वरघांटीं सालेरीस जाऊन छापा घातला. कोंकणांतून पेशवे हशमांनिशीं रवाना केले. हे इकडून येतील तुम्हीं वरघांटींहून ऐसे दुतर्फा चालून घेऊन शत्रू मारून गर्दीस मिळविणें ऐशीं पत्रें पेशवे व प्रतापराव यांस पाठविलीं. त्याप्रमाणें उभयतां दोहींकडून सालेरीस येऊन पावले. आणि शत्रुसैन्यावरि चालून गेले. मोठें तुंबळ युद्ध हत्ती घोडे तोफा मोंगल पठाण अरब रजपूत वगैरे यांशीं जहालें. तेणें पृथ्वी कंपायमान होऊन गगनचुंबित धुळोरा उठला. तीन कोस औरस चौरस गर्दी जहाली. आपपर दिसेनासें होऊन ओळख एकमेकांची मोडली. ऐसें धुरंधर युद्ध, जसें कौरव पांडवयुद्ध [ तसें ] समरंगणीं जहालें. याप्रकारें मर्दुमीची निस्सीमता जहाली. हत्ती घोडे रणास येऊन दोहींकडील माणूस दहा हजार मेले. व जखमी बहुतच होऊन रणभूमीस अचेतन पडले. एक पादहस्तहीन कर्णहीन नासिकचक्षुहीन [ पडले ] व एकाचीं मस्तकें फुटलीं. रण दुंबूं लागलें. रक्तोदकें भूमीस सडाच घातला. धरादेवी शोणितकुंकुमें विराजली. भूतनाथ वेताळ पिशाचसेना घेऊन रणभूमीस प्रेतासनास उभा ठाकला. ऐसा प्रकार होऊन वाताहत होऊन गेली. अविंधांचीं साधनें जीं संपादिलीं तीं महाराजांस समरीं अर्पिलीं. बाकी न्यावयास कांहीं ठेविलीं नाहीं. एकजात हत्ती सवाशें सांपडले व उंट सातशें व घोडीं दहा हजार वस्त्रभाव व जडजवाहिर व वस्त्रें व शस्त्रें गुरें वगैरे हरजिन्नस बहुतच महाराजांचे हातीं लागला. बेवीस वजीर नामांकित धरिले. येखलासखान नबाब पाडाव जहाले. असे बावीस सुभे बुडविले. या युद्धीं महाराजांकडील प्रतापराव व अनंदराव व त्र्यंबकाजी दत्तो व रूपाजी भोसले, सुरराव कांकडे व शिदोजी निंबाळकर व खंडोजी जगताप व गोविंदराव जगताप व संताजी जगताप व

मानाजी मोरे व विसाजी बल्लाळ व मोरो रघुनाथ व मुकुंद बल्लाळ व बाजे उमराव यांणीं जिवाभ्य खस्त केली. मुख्य मोरोपंत पेशवे व प्रतापराव सरनोबत यांणीं अंगेज केला. सुरराव कांकडे पंचहजारी मोठे समशेरबहादर धारकरी यांणीं रणांगणाचे ठायीं भारती अतिरथी वीरांप्रमाणें युद्ध केलें. ते समयीं शूरत्वाची वाग्मितैं अरीस गोचर करवावी हा मनोगतभाव विशेष असतां अकस्मात् श्रीरामचंद्रशरातुल्य जंबूरचा गोळा लागून ठार पडला. तो सामान्य योद्धा नव्हे. प्रत्यक्ष विश्वतोमुखीं नामाधिक जैसा किरीटी किंवा कर्ण किंवा द्रोणात्मज अश्वत्थामाच विलोकितां त्या प्रतिमेचा सुरराव युद्धीं पडला. अशी फत्ते जहाली. म्हणोन पेशवे व सरनोबत या दोघांनीं महाराजांस विनंतीपत्रें जासुदांसमागमें पाठविलीं. तीं पाहून आनंदाचा उदधि हृदयीं उचंबळोन गजशावकातुल्य डुलों लागले. संतोषास पारावार नाहीं. ब्रह्मांडकरंडा भरोन उरला. फत्ते जहाल्याच्या तोफा करवून शर्करा हत्तीवर भरून समस्तांस वांटिली. जासुदांस कृपाळू होऊन भरजरी मंदील व पैठणी पासोड्या व हातांत सोन्याचीं कडीं घातलीं. व एकेकास शंभर शंभर रुपये इनाम बक्षीस दिले. व तेच समयीं बाळाजी आवजी चिटणीस यांस आज्ञापत्रें लिहावयास आज्ञा केली जे, मोरोपंत पेशवे व प्रतापराव गुजर सरनोबत यांस बहुत शाबासकी देऊन लिहिणें. व वरकड लहान थोर सरदारांस समाधानपत्रें लिहिणें. त्याजवरून चिटणीस यांणीं महाराजांचा आनंद चित्तांत आणून पेशवे व प्रतापराव यांस लिहिलें तें येणेंप्रमाणें. राजश्री मोरोपंत पेशवे व प्रतापराव सरनोबत यांस आज्ञा केली ऐसिजे, तुम्ही विनंतिपत्र हुजूर पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ श्रवण जाहला. तुम्ही महत्कार्यकर्ते, धुरीण, अंगाचे कृतकर्मे, करते सेवक, हिंदु, केवळ महाराजांचे पंचप्राण, दुसरा अर्थ तुमचे ठायीं अणुमात्र नाहीं. तुम्हीं या समयीं जिवाची आशा न धरितां येखलासखान नबाब व दिलेलखान हफ्तहजारी हे पादशाही उमराव कांहीं सामान्य नव्हेत, दोघे पादशहाचें नावांजीसे कार्यकर्ते, पादशहाचे तर्कशांतील तीक्ष्ण तीर जैसे, घटोत्कचा सारखे बलोन्मत्त असतां, श्रीअंबा वरदें यवनाचा पराभव करून दिगंतकीर्ति सेवकपणाची तुम्हीं संपादिली. तुमची हिम्मत मर्दुमीची. सेवक असावे तर तुम्हांसारखे पटुतरप्रतापी [ असावे. ] धन्य तुमची! यवन लोक कालरूपी त्यांस महाकाल होऊन समरांगणीं शौर्य कर्माची निस्सीमता करून जैसा सूर्य चंद्रग्रहणीं राहू व केतुरूपें ग्रासावयास आला, किंवा रामायणीं सौमित्रें इंद्रजित् वधिला, याप्रकारें येखलासखान नबाब व दिलेलखान निवटिला. किंवा महाराजांनीं अफजलखान भुजाबळें

---

२०. वा[illegible]=चातुर्य, प्रभाव ह्याअर्थी. | २१. तर्कश=बाणांचा भाता.

बहादर स्वकरें मारिला, शास्तीखान अपमानें दवडिला, किंबहुना औरंगजेब तेजहीन केला, त्याप्रमाणेंच तुम्ही विरश्रीवैभवाची प्रौढता अरिजनास गोचर केली. महाराजांचे मनोरथ सिद्धीस गेले. जैसे गरुड हनुमंत बलोन्मत्त समर्थांचे निकटवर्ती सेवक तैसेच तुम्ही महाराजांचे सेवक. तुम्हांस उत्तीर्ण यासमयीं काय व्हावें? पहातां एक अधिक महाराजांची दया पूर्ण, येणेंकडोन सहविनयतेस व्हाल हाच अर्थ स्वामींनीं दृढ चित्तांत आणोन प्रसादवस्त्रे खासा महाराजांचा मंदील व चादरा, पटके व झगे सुरवारा व अलंकार कलगिया मोतियाचे तुरे व शिरोपेंच व कर्णमात्रा व पदकें व जडित नवरत्नांकित कडीं व हस्तमात्रा व घोडा १ व हत्ती १ एक मोरोपंत पेशवे व प्रतापराव सरनोबत यांस व लहानथोर सेवकांस गौरव महाराजांनीं करून पाठविला. आणि पत्रीं आज्ञा केली जे, अविंधांचे उमराव व वजीर मातबर लोक पाडाव झाले व जखमी शिपायांस वस्त्रे व घोडीं देऊन बहुमानें सोडून देणें " म्हणोन महाराजांनीं हुकूम केला. त्याप्रमाणें चिटणीस यांणीं राजमुद्रांकित लिहून महाराजांस अक्षरशाहा वाचून श्रवण करविलीं. पत्रार्थ महाराजांनीं चित्तांत आणून परम समाधान पावले. महाराजांचे चित्तांत जें जें होतें त्याप्रमाणें चिटणीस यांणीं परम चातुर्यता करून सगर्भ मनोल्हासाचीं आज्ञापत्रे पेशवे व सरनोबत व वरकड सरदारांस पाठविलीं. आणि चिटणीस यांजवर कृपाळू होऊन पालखी देऊन गौरविलें. आणि तुझिया लिहिण्याची साक्ष तुलाच, जो जो मजकूर सांगितला त्याचप्रमाणें कोठें अन्वय जाऊं न देतां लिहितोस, हें इतरांस होणें नाहीं; धन्य तुझें चातुर्य! महाराजांचे तूं केवळ अंतःकरण, सर्व विश्वास महाराजांनीं तुझे स्वाधीन केला आहे, इतरास जाबसाल मनसबा कर्तव्यता अणुमात्र कोणास श्रुत जहाला नाहीं, सर्व इजारत मनसुब्याची तुजवर आहे, अशी तारीफ महाराज करूं लागले. आणि चित्तवृत्ति याचे ठायीं रात्र दिवस सन्निध असावें याप्रकारें गौरव केला.

नंतर पत्रें रवाना जहालेलीं पावलेवरि आज्ञेप्रमाणें अविंधाचे वजीर उमराव मातबर लोकांस वस्त्रे व खर्चास व घोडीं देऊन आनंदयुक्त होत्साता सोडिलें. दिलेलखान सालेरीहून चहूं मजलीवर होता त्यांणीं ही खबर ऐकून माघारा पळून गेला. ही खबर दिल्लीस औरंगजेब पादशाहास कळोन तेसमयीं दिलगीर होऊन, तीन दिवस बाहेर आले नाहींत. चिंताक्रांत होऊन नगारखाना वगैरे वाद्यें बंद ठेवून बहुत अंजुर्दा आहेत म्हणोन अमदखान दिवाण यांस समजोन तेही जवळ

२२. अजुर्दा=कष्टी.
२३-२३. ह्या शब्दांचा संबंध बरोबर जुळत नाहीं.

नाहींत आणि येणेंस्तव बहुत कष्टी व श्रमी होऊन श्वास टाकून बोलले जे, "खुदानें यवनाची पादशाही दूर करून शिवाजी राजे यांस दिली असें प्रत्यक्ष दिसतें. आतां मौत[24] येईल तरि बरें. शिवाजीची कीर्ति ऐकवत नाहीं. तेव्हां बहादरखान खुद्द पादशाहाचे बंधु[25], यांणीं येऊन बहुतां रीतीनें समाधान केलें कीं, "तुम्ही दिल्लीस पादशाही खुशाल करणें. आम्ही शिवाजीवर जाऊन त्यास तंबी देऊन त्याचें लष्कर इकडील मुलखांत न ये असें करितों. नाना हुन्नर कळेल तैसें करून ठायीं ठेवितों. त्याची परवा तो काय? येविशीं कांहीं फिकीर न करावी. ऐसें समाधान करून पादशाहास तख्तावर बसवून नंतर त्यांणीं यांस नावाजून वस्त्रें अलंकार व आपले गळेंतील पदकें व शिरपेंच व कलगी व जडावाचीं दोन कडीं हस्तकीं व उत्तम घोडीं ५ पांच व हत्ती पलखदंती तीन दिधले. तदनंतर दौलतही जाफा दिधली. आणि समागमें सत्तर हजार स्वार दिलेलखानसह दिधले. येणेंप्रमाणें फौज दक्षिणेस मोहिमेवरि पाठविली.

ते मजल दर मजल आल्याची बातमी महाराजांस समजतांच बोलिले जे, "बहादरखान पेंडीचें गुरूं आहे. त्याचा गुमान तो काय? त्यास आपल्या मुलखांत यावयास दोन वर्षें लागतील." मग अण्णाजी दत्तो सुरनीस यांणीं मालसांवत मावळे यांचे हजारी यांस सांगून पनाळा घेतला. चंदन वंदन सातारा नांदागिरी परळी हे किल्ले घेतले. महाराजांची स्वारी देश पहावयास रायरीहून निघोन, वांईचा कोट येत येतां घेऊन, कन्हाड व शिरोळ व कोल्हापूर वगैरे कोट आणि हुकेरी रायबागपर्यंत घेतला. मुलुख चौतर्फा सुटला. त्यांत आटोप कैसा होईल? तेव्हां पेशवे यांचे हवाला कल्याण भिंवडी पासून कोंकण वरघाट लोहगड जुन्नर बारा मावळें हरळ्याघाटापासून केला. व अण्णाजीपंत यांचे स्वाधीन चेऊलपासून दाभोळ राजापूर कुडाळ बांदें व फोंडें अकोलपर्यंत केलें. वरघाट वांईपासून कोपळ तुंगभद्रा पावेतों देश नेमून दत्तोपंत वाकनीस यांचे स्वाधीन केला. व त्यास पनाळेस ठेविलें. ऐसें करून याखेरीज मोगलाई देशांत सुभे ठेवून ते पेशवे यांचे स्वाधीन केले. कोट किल्लेदार व कारकून व लोक ठेवणें ते महाराजांनीं नजरेनें पाहून ठेवावे. कार्याचे माणूस पाहून तैनात जाजती हशमास करणें ते [करावी.] सर कारकुनाचे मुतालीक सर्वकाळ जवळ असावे. वर्षास हिशेब मुलुकाचा व रसद[26] घेऊन सरकारकुनांनीं राजदर्शनास यावें. येणेंप्रमाणें कारभार करीत चालिले.

---

२४. मौत मरण.
२५. पादशहाचे सर्व सख्खे बंधु तर पूर्वींच नाश पावले होते.
२६. रसद=वसूल, सरकार तिजोरी.

पुढे विजापुराहून अबदुल करीमखान बारा हजार स्वारानिशीं महाराजांचे देशावरि रवाना केला तो फौजेनिशीं इकडे येऊं लागला. ही खबर महाराजांस कळोन कुल लष्कर प्रतापराव यास हुकूम केला कीं, बाहलोलखान आला हा चळवळ करितो यास मारून फत्ते करणे. ऐसें सांगोन रवाना केलें. त्यांणीं जाऊन उबराणीस नबाब यांस फौजा चौतर्फांनीं कोंडून उभा केला. पाणी नसलेमुळें जेरीस येऊन हे आटपत नाहींत हें समजोन प्रतापराव यास सांगून पाठविलें कीं, " आम्ही तुम्हांवर येत नाहीं, पादशहाचे हुकुमानें आलों; परंतु सर्वस्वीं तुमचा आहें. महाराजांचे वचना बाहेर नाहीं. " असा करार करून कुराणाची शपथ दिली आणि सल्लाह केला. तदनंतर महाराजांची फौज निघोन आली. हें महाराजांस समजलेयावरून आज्ञा पाठविली कीं, सख्य काय सबब केलें? आणि रागास आले. प्रतापराव फौजेनिशीं भागानगर चांदे देवगड शंभगिरी हा मोंगलाई देश मारून लुटून माघारे आले.

महाराजांजवळ निळो सोनदेव मजमदार होते ते मृत्यु पावले. यांचे वडील पुत्र नारोपंत शहाणे नव्हते. दुसरे रामचंद्रपंत उमदा सुलक्षण परम सुंदर बुद्धिमंत सर्वगुणसंपन्न चिन्हांकित पाहून, परम संतुष्ट होऊन बोलले जे, हा मोठे अदृष्टांचा, शहाणा, भाग्यवंत, कार्यकर्ता, धुरीण राज्याचा स्तंभ होईल. अशी परीक्षा केली. परंतु मूर्त ल्हान म्हणून नारोपंतास मजमू सांगून वस्त्रे भूषणें देऊन लौकिक संपादिला आणि स्वारीस समागमें चालविला.

मागती विजापुराहून बाहलोलखान पनाळे प्रांतीं पादशहानीं रवाना केला तो संपगांव प्रांतीं आल्याचें समजतांच महाराज म्हणों लागले कीं, हा घडोघडी येतो. मागती प्रतापराव यास फौजेनिशीं जाण्यास हुकूम केला. हुकुमाप्रमाणें जलदीनें जाऊन नेसेरीवरि[२९] होता त्यास गांठून मोठें युद्ध केलें. त्या लढाईंत प्रतापराव तरवारीचे घारानें ठार झाला. नवाब विजापुरास गेला. महाराजांची फौज पनाळे नजीक आली. ही खबर महाराजांस कळोन बहुत कष्टी होऊन आज एक बाजू खचली, फत्ते करणें विशीं सांगितलें तसें न करतां परत न येणेचे कारणानें खस्त[३०] करून प्राण वेंचून बरें म्हणविलें. आतां लष्करचा बंद करून चालवावें हा विचार प्राप्त होऊन दुसरा कोण करावा या विवंचनेंत महाराज लागले. तदनंतर लष्करांत येऊन कूच करून चिपळूण जागा श्रीपरशुराम आहे तेथें येऊन राहिले. फौजेची पाहणी करून ल्हान थोर कर्ते शिपाई लोकांस

२७. अबदुलकरीम याचें नांव बहिलोलखान.

२८. अदृष्ट—नशीब.

२९. " जेसरी " असेंही होईल.

३०. खस्त—श्रम, मेहनत.

खजाना फोडून वांटणी करून, सरनोबतीस योग्य अनसाजी मोहिते पागेंतील जुमला शहाणा मर्द सबुरीचा मोठा धारकरी चौकस पाहून त्याचें नांव हंबीरराव मोहिते ठेवून किताब देऊन दिलदिलासा करून त्याचे तौबीन लष्कर केलें.

दिल्लीहून बहादरखान व दिलेलखान फौजेनिशीं येऊन नगरास येऊन राहिल्याची खबर महाराजांस समजलियावरि किल्ले कोट गड यांस खबरदारीची ताकीद केली. आणि जासुदासमागमें नबाब बहादरखान याजकडे हरिद्रें घ्यावयास गुप्तरूपें पत्रें पाठविलीं. आणि पुढें जी तजवीज करणें ती करितां येईल म्हणोन लष्कर घेऊन मोंगलाईंत जाऊन खानदेश, बागलाण व गुजराथ, अमदाबाद व बऱ्हाणपूर व बऱ्हाड व माहूर वरकड देश नर्मदापर्यंत दाखल जहाला. जालनापूर देशांत स्वारी करून जप्ती बैसविली. मालमत्ता अगणित जमा करून चालिले. बहादरखान यांणीं फौज घेऊन हंबीरराव यांचे पाठीस लागला. तों महाराजांचे फौजेची [ गांठ ] पडली. तों मोंगल बहुत धास्तीनें घाबरा होऊन सात आठ गांवचे अंतरानें चालिला. दिलेलखान उतावेळा होऊन फौजेनिशीं गांठ घातली. त्यास हंबीरराव यांणीं नजरेस न आणितां तोलदारीनें मालमत्ता घेऊन येऊन महाराजांस दिधली.

पुढें महाराजांची कीर्ति ऐकून वेदमूर्ति सकल वेदशास्त्रसंपन्न, प्रत्यक्ष वेदोनारायण, प्रख्यात तपोतेजस्वी महापांडित्य अग्रगण्य, संपूर्ण पांडित्यसमूहाचे अधिपच, द्विजकुलांत देदीप्यमान, संपूर्ण अमरांसहित अमरेंद्र मस्तकें डुलावीत आहे, त्रैलोक्यभुवनीं वंद्य, शापादपि शरादपि, जैसा प्रतिसृष्टिकर्ता विश्वामित्र, किंवा ..., पराशर, व्यास, भूरिश्रवा, कण्व, मेधातिथि, जयमिनी, ...य, कपिल महामुनी, शुक योगेंद्र,* गाधिज, मार्कंडेय, गौतम, मांडुक, पौतिक, अगस्तिच दुसरा भूमंडळाचे ठायीं, भारद्वाज, दुर्वास, भगिरथ, मांडव्य, भूतळाचे ठायीं दशग्रंथी चतुःशास्त्री प्रत्यक्ष श्रीवेदजातच

---

... ...च स्पष्ट मूळांत ... असें आढळतें ...

...ांत.

३०-३१. ... अनसाजी ... बाबेंत.

३३. इतरत्र " हंसाजी ... तील बातमी.

३४. सबुरीचा=धिमा ... गर " असें आहे

३५. ताबीन=... कारण तेथेंच बहादूरखान

पण तें चुकीच. ... होता

* " तपोतेजस्वी " संस्कृत प्रौढ शब्द वापरण्याची हौस ग्रंथकार यास फार, पण ते असे बरेच ठिकाणीं फसतात. " तपस्तेजस्वी " " योगींद्र " असें पाहिजे होतें.

३६. " शापादपि शरादपि " याचा मूळार्थ " शापानें व शरानें " दोन्हीकडून नाश करण्याची शक्ति ज्यास असे ब्राह्मण. " ब्राह्मं क्षात्रमुभे मयि " या अर्थी. येथें " मोठे शक्तिमान् " इतकाच अर्थ घ्यावयाचा.

मूर्तिमंत, स्वामींचें अकस्मौत्[37] मनोजयप्राय देशावराप्रीत्यर्थ श्रीस्वर्गगामिनी भागीरथी अनुक्रमें मनकर्णिका यमुना श्रीसूर्यकन्यका प्रयागस्थळाहून भटगोसावी महातपो तेजस्वी यांचें आगमन जहालें. हें वृत्त श्रवण होतां महाराज अष्टप्रधान व मामादिक व सरदार व समस्त सेनासमुदाय [ यां ] सहित महाभेरी व नगारे व तुरतुरे, करणे मौळू[38] व शिंगें व पणवा, नफेरिया, झल्लरी वाजंत्रें, मृदंग, शंख, पांवे, मोहरी[39] महावाद्यगजरें वेदशास्त्रसंपन्न राजश्री गागा भट्टजींस सामोरां जाऊन, चरणावरि मस्तक ठेवून शिरसा अभिवंदन साष्टांगें नमस्कार घालून, अत्यादरें श्रीगुरुराय मानोन, सन्मानें स्थळास आणून बिन्हाड अति उत्तम वास करावयास दिधलें. सर्व स्नानसंध्यादि [ कर्मे करण्यास ] यथायुक्त रमणीक स्थळ बावांस संतोषावह ऐसेंच योजून अर्पिलें. वरचेवरि परामर्ष करावया अष्टप्रधानांस आज्ञा केली जे, अणुमात्र साहित्य न्यून पडों न देतां सांगोपांग इच्छित आज्ञा करितांच शीघ्र वरचेवरि करीत जाणें.

तदनंतर दुसरे दिवशीं महाराजांनीं भटजींस राजमंदिरास नेलें. श्रीसन्महाराज मातुश्री जिजाऊ आईसाहेब यांस व सकल सौभाग्यादिसंपन्न सईबाई साहेबांस दर्शन करविलें. तदनंतर अभ्युत्थान देऊन, कनकासनारूढ करवून, संपूर्ण सेवकजनांस आज्ञा करून, पूजोपचाराचीं साहित्यें आणवून भटजींस सुगंधित स्नेहें[40] चमेली, सुगंधराज, मोगरेल, व गुलाबीअत्तर नानाप्रकारचीं व चुंवा, चंदन, केशर, कस्तुरी, अरगजा, मिश्रित करून उटणें केलें. तदनंतर उष्णोदकें स्नान घातलें. भरजरी तेजःपुंज महावस्त्रें चिरा[41] चादर बादली देऊन पूजोपचारास दुसरीं वस्त्रें शालजोडी इत्यादि प्रकारें कनकासनावरि रूढवोन कनकाभिषेक मुक्त माणकें पाच पेरोजें[42] लसणं,
नील प्रवाल मिश्रित करून केला. तदुत्तर सुगंधित अष्टगंधें
व कुंकुमागर व कृष्णागर, केशर, कस्तुरी, अर्पण केलें. सुमनं चंपक मालती व गुलाब, शेवती, बकुल, पारिजातक, जाई, जुई, करवीर, कुंद व आरक्त कमळें व श्वेतोत्पलें व नीलोत्पलें व या विरहित कनकाब्जें व श्रीतुलशी द्विजराजांस
[अर्पून] महाराजांनीं पुष्पांजलियुक्त करकमलें चरणकम
ंतर

३७. मूळांत "अकमास्त" असें आहे तें हस्तदोषानें पडलें असावें.

३८. माळू=मृदंग ?

३९. "मोहरी पणवाभिदः" राज व्यवहार कोशी.

४०. स्नेह=तेल.

४१. चुवा
४२. चिरा=रु पूजिलें. तदन
कलाबतू असते न्याची
उपयोग करितात. सार. एवजीं

४३. पेरोज=अस्र पटका, ह्यांत सं
शेष. नीळ. चा पागोट्यान वि-

गडाचे माचीस राहवयास येतों. त्यांनीं उत्तर दिलें कीं, आमचा दुसरा विचार नाहीं. सुखरूप येऊन राहणें. असें उत्तर येतां च गडाखालीं जाऊन छावणीस पागा हजार मावळे लोक देखील जाऊन राहिले. पर्जन्यकाळ क्रमिल्यावर दिपवाळीसण आला. निळोजी निळकंठराव यांचे धाकटे बंधु दोघे होते. पिलाजी निळकंठराव व शंकाजी निळकंठराव. निळोजी निळकंठराव वडील. ते किल्ल्याचें व गांवगन्नाचें काम करीत होते. धाकटे भावांस बांटा देत नव्हते. अन्नवस्त्र मात्र देऊन एक स्थळीं ठेविलें होतें. धाकटे भावांनीं शिवाजी राजे यांस एकांतीं भेटून अनुसंधान लाविलें होतें. दिपवाळी सणाबद्दल जिजाऊस व शिवाजी राजे यांस आमंत्रण सांगावयासि वडिलानें धाकटे भावास पाठविलें. त्याणें येऊन आमंत्रण सांगितलें. त्यासि उत्तर केलें कीं आम्हांस लोक टाकून येतां नये. येथें ही तुमचें च आहे. म्हणून त्यासि फिरून पाठविलें. आमंत्रण घेतलें नाहीं. मागुती तिघांनीं विचार केला जे, शहाजी राजे यांचा व आपला घरोबा. त्यांचा पुत्र व स्त्री येथें असतां दिपवाळीस न आणितां भाऊपणास उचित दिसत नाहीं. त्यांचा शब्द लागेल. करितां मागुती उभयतां सर्व लोकांसमवेत बारगीर मावळे देखील खासदार यांसि एकंदर परवानगी देऊन गडावर समस्तांस घेऊन गेले. तीन दिवस न्हाणें भोजन होऊन उत्तम वस्त्रे उभयतांस व लोकांस दिलीं. द्वितीयेस भाऊबीज करून बोळवण करावी असें होतें. ते दिवशीं भोजन जाहालें. रात्रीं जाणार होते, परंतु जाणें न जाहालें. निळकंठराव [यांनीं स्त्री] सहवर्तमान निद्रा केली. प्रातःकाळची चार घटिका रात्र असतां पिलाजी निळकंठराव व शंकाजी निळकंठराव यांनीं शिवाजी राजे यांस सावध केलें. अगोदर सूचना होती. ते समयीं निळोजी निळकंठराव यांच्या पलंगाखालीं रेशमी काढण्या घालून बांधिला. त्याची स्त्री एकीकडे काढून पायीं बेडी घातली. उभयतां भावांच्या ही पायीं बेड्या घातल्या. कोठींत ठेवून गडाच्या दरवाज्यांवर मावळे लोक पाठवून जागजागां चौक्या ठेविल्या. त्यांचे लोक तीन हजार फितुरांत होते ते ही काढून दिले. त्या लोकांच्या बायका गडाखालीं काढून देऊन वस्तभाव घेतैली. ते समयीं गडावर हवलदार बाजी घोलप, अनाजी रंगनाथ मळेकर सबनीस, ठेवून पांच हजार मावळे नेहमीं ठेवून निळकंठराव यांजकडील खजीना व त्यांत सांपडलें तें ही घेऊन त्यांस तीन रोज कैद करून ठेवून तदोत्तर बायका वस्तभावसुद्धां त्रिवर्गांस इनाम देऊन मौजे चामळीस ठेविलें. अद्यापि त्यांचें वतन सरनायकीचें त्यांच्या वंशास चालत आहे.

---

३३. शिवाजीनें पुरंदर इ० स० १६४७ त घेतला.

अनुक्रमणिका

कसबे सुपें[३४] येथें शहाजी राजे यांचे मेहुणे सौभाग्यवती तुकाबाईचे भाऊ होते. त्यांचे भेटीस जाऊन त्यांस कैद केलें. त्यांच्या तीनशें पागा व द्रव्य घेतलें. ठाणें बसवून मग सोडिलें. त्याउपरि चाकणेचें[३५] ठाणें दादाजीपंतांचे होतें. तेथें फिरंगोजी नरसाळा हवालदार ठेवून किल्ला आपले स्वाधीन ठेविला. महालाचे हवालदार काशीराम अत्रे देशपांड्ये सासवडकर बहुत दिवस होते. त्याजवर राजगड[३६] व पद्मावती व संजीवनी व सुवेळा घेऊन किल्लयाचे इमारतीचें काम लाविलें. त्या कामावर [३७]मोरो त्रिमळ पिंगळे चाकरीस ठेविले. त्या उपरि सिंहगड निजामशाई[*] किल्ला तोरणा[३८] प्रचंडगड घेतला. पातशाई खजीना होता त्याची पाळत आणोन बेरड पाठवून खजीना लुटून आणिला. दोन लक्ष होन [ पो ] त्यासि दाखल केले. शामराजपंतांस पेशवाई दिली.

ही खबर विजापुरीं पातशाहास[३९] पोहोंचली. त्याजवरून पातशाहांनीं कौल पाठवन महाराजांस जाणविलें जे, तुम्ही पातशाहीचाकर असून, मुलुख मारितां, किल्ले घेतां, खजीने लुटतां, रयतेस आजार देतां, हें उत्तम करीत नाहीं. बरें, जालें तें माफ असे, तुम्ही हुजुर येणें. तुम्हांस दौलत देऊं, सरफराज करूं, म्हणोन लिहिलें. त्याजवरून हुजूर जावें न जावें असा विचार करितां महालांत जाऊन सईबाई स्त्रीस विचारणा केली. पुसलें जे, पातशाहांनीं कौल पाठवून भेटीस बोलाविलें आहे जावें कीं न जावें ? सईबाईनीं उत्तर केलें कीं, आम्हां स्त्रियांस पुसावें असें नाहीं. महाराज काय समजोन पुसतात हें नकळे. थोर थोर लोक मुत्सदी वगैरे आहेत, ज्यांचा भरंवसा असेल त्यांस विचार पुसावा. बायकांच्या बुद्धीचा विचार किती ? श्लोक. आत्मबुद्धिर्हितार्थाय गुरुबुद्धिर्विशेषतः। परबुद्धिर्विनाशाय स्त्रीबुद्धिः प्रलयं गता ॥ १ ॥ स्त्रियांची बुद्धि या प्रकारची निंद्य आहे. महाराज बोलले कीं, तुम्ही बोललां हें सत्य. परंतु स्त्रियास्त्रियांत अंतर आहे. स्त्री म्हणजे घरचा प्रधान याजकरितां विचारलें. त्याजवरून सईबाई बोलली कीं, महाराजांचे वडील हुजूर आहेत. महाराजांनीं पातशाई किल्ले घेतले, खजीना लुटला, मारिला, याजकारितां हुजूर जावें हा सल्ला नाहीं.

---

३४. सुपें परगणा इ० स० १६३७—३८ त घेतला.

३५. चाकणचा किल्ला इ० स० १६३७-३८ त घेतला.

३६. राजगड किल्ला मोरबद डोंगरावर इ० स० १६४७ त शिवाजीनें बांधिला.

३७. मोरो त्रिमळ पिंगळे इ० स० १६५१ त चाकरीस राहिले.

* वस्तुतः शिवाजी पराक्रम करूं लागला तेव्हां निजामशाही जिवंत नव्हती. एथें अदलशाही असावेंसें वाटतें.

३८. तोरणा इ० स० १६४६ त घेतला.

३९. यावेळीं विजापुरीं महमद अदिलशहा गादीवर होता. ह्यानें इ० स० १६२६ पासून इ० स० १६५६ पर्यंत राज्य केलें.

अनुक्रमणिका

वडिलांवर दृष्टि देऊन जाल तेव्हां बरें कसें दिसेल ? राज्य करावें असें असेल तर श्रीशंकरजीस शरण जावें. श्री जें नेमून कार्य करील तें पहावें. राज्य करणें त्यास मोह कैंचा. कंबरेस *दाली बांधावी. पुढें जें होणें तें होईल. हें ऐकून महाराज परम संतोष जाहाले. उचित द्यावयास पाहतां शहाजी राजे महाराजांनीं कर्नाटक प्रांतांतून पोवळ्यांचा पलंग व §दाब चौलक्ष होनांची व जिरें बखतरें व टोप व फिरंग तारवावरून जलमार्गें पाठविलीं होतीं त्यांपैकीं दाब सईबाईस दिली. बहुत संतोष होऊन श्रीस्मरण करून कंबरबंदी केली.

निळो सोनदेव यांसि मुजमी दिली. शिपाई लोकांचा व लष्करचा जमाव केला. जागजागां स्वाऱ्या शिकाऱ्या करून पैका मेळवावा तो लोकांस वांटून द्यावा. असें करीत असतां किल्ले घेऊन बंदोबस्ती केली. राज्यास आव घातला. सोंडवळकर व कोंडवळकर व जंजीरकर व राजपुरीकर तर्फेचे लोकांनीं तमाम कागद पाठवून वर्तमान जाणविलें कीं, महाराजांनीं कोंकणांत आल्यावर आपण भेटीस येऊं. त्याउपर महाराज कोंकणांत उतरले. सोंडवळकर व कोंडवळकर येऊन भेटले. सुरगड व बिरवाडी किल्ला सुवेळा वसविला. जागजागीं ठाणीं वसवून शिवापुरास गेले. शावजी सोमनाथ यांजला कारभार सांगोन रघुनाथ बल्लाळ कोरडे सबनीस यांस किल्ल्याची खबरदारी सांगोन निराजीपंतास जवळ ठेविलें. सोमनाथपंतास डबिरी दिली.

तदनंतर विजापुराहून सातशें बारगीर चाकर रहावयास आले त्यांसि महाराज बोलले कीं, आम्हांजवळ काय आहे ? याचें कसें करावें ? हें ऐकोन गोमाजी नाईक बोलले कीं, महाराजांस राज्य करणें आहे. साफ उत्तर कसे देतात. त्यांचा मुद्दा मनास आणोन त्यांचे कबिले कोठें आहेत त्याची चौकशी करून उत्तर काय देणें तें द्यावें. आपणाजवळ काय आहे म्हणोन भ्रम तोडावा ही राज्यनीति नव्हे. महाराजांस काय कमी आहे ! सरकारकून बोलावून विचार करावा. मग परकीयांस उत्तर देणें तें द्यावें. त्याजवरून सरकारकून व सरदार बोलावून आणिले. विचार करून बारगिरांचे कबिले विजापुराहून आणवोन त्यांजला चाकरीस [४०]ठेविलें. त्याजवर राघो बल्लाळ अत्रे यांसि सुभा सांगोन त्यांचे स्वाधीन ते बारगीर केले.

निळो सोनदेव मुजुमदार यांसि मुलूखगिरीचा सुभा सांगितला. त्यानें मुलखास कौल देऊन रयत आबादानी केली. त्याउपर पायलोक जमाव केला. मावळे;

* दाली—तरवार लटकविण्याच्या कमरपट्टा; दाली बांधणें=दुसऱ्याशीं लढण्यास तयार असणें.

§ दाब=सोन्याचा कमरपट्टा.

४० इ० स० १६५८ त हे लोक चाकरीस ठेविले.

हमाले, पाडळ, निंबाळकर, कांकडे, घाडगे, जगताप, सोनवळकर, पालेकर, गुजर वगैरे यांसि सांगोन विचार करून आंवढा व पट्टा § दोन्ही किल्ले घेऊन त्यांजवर नरहर आनंदराव यांसि पेशवाई दिली. तदोत्तर रायगडास व सुवेळेस इमारत जाहाली. नंतर मुख्य तेथें राहूं लागले. त्याउपर चाळीस हजार मावळे चाकर ठेविले.

बारा मावळचे राजे चंद्रराव मोरे जावळीकर विजापूरच्या पातशाहास खंडणी दरसाल देऊन होते. त्यांचा दिवाण हणमंतराव मोरे याची कन्या नवरी सुंदर उपवर होती. तिचे सोयरिकीबद्दल रघुनाथ बल्लाळ सबनीस यांसि हणमंतराव मोरे यांजकडे शिष्टाईस पाठविले. त्यांचे राज्यांत झाडी बहुत. याजकरितां रघुनाथ बल्लाळ यांच्या समागमें पंचवीस स्वार व शंभर मावळे देऊन रवाना केलें. हणमंतराव मोरे जोतें उतरोन आंगणांत भेटीस आले. भेट होतांच दगा करून कटारीनें त्यांस मारिलें. दारीं दहावीस लोक होते तेही मारिले. वांईहून रातोरात किल्ले पुरंदरास आले. राजे बहुत संतोष होऊन शिरपाव दिला. दुसरे दिवशीं चाळीस हजार मावळे घेऊन रातोरात चालोन तिसरे रोजीं श्रीमहाबळेश्वराहून निसणीचा घाट उतरोन जावळीस आले. रघुनाथ बल्लाळ सबनीस यांचे समागमें फौज देऊन माणकोजी दाहातोंडे सेनापति होते ते व सबनीस फौजसुद्धां रडतोंडीचे घाटानें उतरून जावळीस आले. तिजला वेढा घातला. दोनप्रहर पर्यंत लढाई जाहाली. जावळी घेतली. राजश्री बाजीराव कृष्ण मोरे पंधरा सोळा वर्षांचे उमरींत होते. त्यांसि स्त्रियांसुद्धां कैद केलें. मालमत्ता द्रव्य सांडलें बहुत सांपडलें. पुरातन राज्याचा भंग केला. मालमत्ता तेथील घेऊन प्रतापगडीं सुवेळा येथें श्रीदेवीची स्थापना [१२] केली. मावळे चौकीस ठेविले. उभयतां मोरे घेऊन पुण्यास आले. तैलाभ्यंग करून उत्तम भोजन घालोन पुण्याचे दक्षणेसन्निध निमजागा आहे ते स्थळीं उभयतांचा शिरच्छेद केला. मोऱ्यांच्या स्त्रिया व कन्या होत्या त्यांची सोयरीक न करितां सोडून सर्वत्रांस दिलें. चंद्रावमोरे जावळीकर यांचे राज्याची दशा करून राज्य घेतलें. साठ हजार मावळे नांवाजून सही केले. द्रव्य बहुत जमा जाहालें.

त्याजउपर कोयनाकांठ सोडविला. वासोटा किल्ला घेतला. मावळे लोक यांजला कौल पाठवून भेटीस आणिलें. हाजूरगोळे व पांढरे व मोरे व

§ हे दोन्ही किल्ले नगर जिल्ह्यांत आकोलें तालुक्यांत आहेत.

११. ही गोष्ट इ० स० १६५८त घडली.

१२. प्रतापगडास देवीची स्थापना इ० स० १६६१ त केली.

हसेकर व दुदुसकर यांसि नांवाजून सुभे जुमले सांगितले आणि बक्षिसी दिल्या. तदोत्तर जाऊन कल्याण मारिलें. राजश्री आबाजी सोनदेव यांनी साराच आटोप केला. मशारनिल्हेस मुसलमानाची स्त्री चांगली सांपडली होती ती महाराजांस नजर केली. महाराजांनीं उत्तर केलें कीं, जिजाऊ साहेबांचे स्वरूप असें सुंदर असतें तर आम्ही या प्रमाणेंच जालों असतों. असें बोलोन तिजला कन्येप्रमाणें मोजून तिजला वस्त्रे अलंकार देऊन समागमें पांचशे स्वार दिले आणि विजापुरास पोहोंचविली.

मग येऊन रायगड पटिला लिंगाणा किल्ला बांधिला. आबाजीपंतीं कल्याणचा बंदोबस्त केला. मामले चऊल येथें जाऊन शहर मारिलें. तेथें गुजर होते त्यांजपासून बहुत मत्ता घेतला. तेथें काजी होता तो सांपडला. शहरास व मुलकास कौल दिला. याउपर महाराजांनीं प्रधानगड घेतला. तेथें केशर शिंग होता त्यानें जोहर केला. कबिले मारिले. त्यांत दोघे पुत्र वांचले होते ते घेऊन केशर शिंग याची मातोश्री किल्ल्यावर पळून गेली होती ती झाडीमध्यें लपून राहिली. झुंज जाहालें. केशरशिंग पडला. किल्ला फत्ते जाहाला. महाराज किल्ल्यावर चढून गेले. मार्गीं बोरीची कांटी पालखीस लागली. तेव्हां महाराज बोलले कीं, कांटी आपल्यास आक्षेप करिती काय निमित्य! इजखालीं खणावें. तेथें मालाचा चौक लागला. त्यांत अकबरी मोहोरा व होन व सोन्याच्या कांबींचे तुकडे मिळोन बावीस घागरी व चार कढया सांपडल्या. किल्ल्याचा झाडा घेतला तों केशरशिंगाची आई सांपडली. तिचे पायांवर डोई ठेवून पालखींत बसवून गडाखालीं आणिली. केशरशिंग वगैरे रजपूत रणीं पडले होते त्यांजपाशीं आणोन अग्नि दिला. कितीक दिवशीं त्याचे आईस व पुत्रास पायलोक समागमें देऊन वतनावर रवाना करून दिलें.

गोंवेंकर सांवत जमाव करून तळें घोंसाळें येथील मुलूख मारून गेले. ते समयीं महाराजांचें शरीर स्वस्थ नव्हतें. याजकरितां श्री हरिहरेश्वरीं जाऊन तेथें व्यथेचा परिहार केला. तेथून आल्यावर कितीकां दिवशीं मागती हरिहरेश्वरास गेले. ते वेळेस गोंव्यापाशीं आले. तेथील सांवत भेटावयास आले ते च हस्तगत करून त्यांजपाशीं फिरंग एक फार चांगली अपूर्व होती ती घेतली आणि त्यांसि नांवाजून चाकर ठेविला. पालवणकर व दळवी राजे जाऊन पातशाही चाकर झाले. तेव्हां वरचेवर घाटमाथ्याचे किल्ले बांधिले. इमारत जागजागां काम लाविलें. राजपूर मारिलें. शृंगारपूरकर सुरवे यांजला युक्तीनें पळवून देशधडी केलें. मुलुख हस्तगत केला. त्याजवर कुडाळप्रांतीं

---

४३. कल्याण इ० स० १६४८ त मारिलें.

स्वारी करून कुडाळकर सांवत व भोंसले परागंदा करून फिरंगाणांत पळवि-ले. तेथील मुलुखाचा बंदोबस्त करून फोंडीयाचे कोटास आले. तो कोट जोरावर म्हणून त्यास सुरुंग लावून उडविला. फत्ते झाली.

हें वर्तमान विजापुरीं पातशहास जाहीर जाहलें. शहाजी राजे करनाटकां-त होते. त्यांजपाशीं लिहिलें. त्यांनीं उत्तर दिलें कीं, आपण आपले स्त्रीचा व पुत्राचा त्याग केला आहे. तुम्हांस कळेल तें करणें. आमचें ते एकत नाहींत. त्याउपर अफजलखान भटारी कचेरीस बसला होता तो सरदार मोठा. बारा हजार स्वार त्याजपाशीं जमियत होती. बहुत दुष्ट. तुळजापुरीं त्याणें श्रीदेवीस उपद्रव केला होता. पैजेचा विडा घेऊन फौजेसहवर्तमान वांईस आला. शिवाजी राजे जिजाऊस घेऊन प्रतापगडास आले. साठ हजार मावळे होते. अफजलखानानें आपला दिवाण कृष्णाजी भास्कर महाराजांकडेस शि-ष्टाईस पाठविला जे, तुम्ही भेटीस येणें. तुम्हांस दौलत शहाजीपेक्षां विशेष देऊं. पातशहास भेटवितों. बेविश्वास भेटीस यावें. कृष्णाजी भास्कर यांस राजे यांनीं उत्तर दिलें जे, भेट घेतों, परंतु तुमचे लष्करांत येत नाहीं. प्रताप-गडचे दरवाजाखालीं बाहेर सदर करितों. तेथें खुद्द अफजलखान व तुम्ही येणें. वचन प्रमाण देऊन हातीं धरून घेऊन जाणें. पातशहाचे भेटीस येतों असें बोलोन त्यासि वस्त्रे भूषणें देऊन गौरव केला. घोडा खासा बसावयास दिला आणि एकांतीं बसून विचारिलें शफतपूर्वक कीं, खानाचे चित्तांत काय आहे ? त्यानें सविस्तर वर्तमान निवेदन केलें. मग बोलिले जे, तुम्ही आपला मतलब सांगावा. " त्यासि जावळीस घेऊन येतों. तेथें एकांतीं नेऊन जें फावेल तें करावें." याप्रमाणें बोलोन चालिला. समागमें आपले तर्फेनें वकील दत्ताजी गोपिनाथ बोकील मौजे हिवरें नजीक सासवड यांस देऊन रवाना केलें. त्या-णीं जाऊन हकीकत जाहीर केली. बहुत प्रकारें समजाविलें. तेव्हां भेटीस जावें असा निश्चय जाला. हें वर्तमान दत्ताजी गोपिनाथ यांणीं राजे यांस लिहिलें. त्याजवरून गडाचे बुरजाखालीं दरवाजाचे सन्निध गडकरी बेलदार बोलावून अनाजी रघुनाथ सबनीस यांसि सांगितलें. सदर तयार करविली. मखमाली डेरे वगैरे सोनेरी कामें केलीं. बिछाने उत्तम तयार केले. मावळे वगैरे लोकांचा ज-माव करून पाठी थापटून फार नांवाजलें. जावळीचा घाट धरून बारा हजार मावळे जागजागां ठेविले. वाटा मोकळ्या ठेविल्या. लोकांस बोलले कीं, अफज-लखान येत आहे. आम्ही त्याचे भेटीस जातों. किल्ल्यावर तोफा तयार केल्या. लोकांस इशारत सांगितली कीं, खानास आपण मारिलें म्हणजे गडकरी किल्ल्या-वरील तोफांचे आवाज करतील तेव्हां तुम्ही त्यांचें लष्कर कुल बुडविणें.

जो कौलास येईल त्यास राखणें. वरकड लष्कर न जाऊं देणें. याप्रमाणें संकेत केला. अफजलखान तोफा व बुणगें वाईस ठेवून, सडे फौजसुद्धां, बेलदार झाडी तोडावयास समागमें घेऊन, खंडोजी रोहिकर पांच हजार मावळे यांचा सरदार हरोळीस[४] होता, त्यास बरोबर घेऊन, प्रतापगडास जातां हत्ती निशाणाचा गुंतला. तेथें चालेना. तेथें बहुतांनी वर्जिलें कीं न जावें. परंतु ऐकिलें नाहीं आणि त्या हत्तीचे डोळे फोडिले. दुसरे हत्तीवर निशाण देऊन झाडी तोडून वाटा करीत रडतोंडीचा घाट उतरोन कोयनातीरीं खोऱ्यांत झाडी तोडून मुकाम केला. तेथून कृष्णाजी भास्कर व दत्ताजी गोपिनाथ [यांस] पाठविलें कीं, लष्करांत भेटीस येणें. तेथेंच उत्तर केलें कीं, सदरेस तुम्ही सडे एकटे येणें. तेथें भेट होईल. हा निग्रह पाहून अफजलखान फाजीलखान पुत्र होता त्यासि लष्करांत ठेवून आपण पालखींत बसून स्वार जाले. भोई बत्तीस व खिजमतगार पांच व कृष्णाजी भास्कर दिवाण व दत्ताजी गोपिनाथ वकील राजाकडील पर्वत चढून सदरेसन्निध आले. अगोदर राजश्रीनें सदरेस मागें मोठी गर्ता खणून ठेविली होती. त्यांत धारकरी चाळीस असामी संभाजी व कावजी व हिरोजी फर्जंद व सोन महाला व जीव महाला वगैरे चाळीसजण बसविले होते. त्या उपर शिवाजी राजांनीं बख्तर आंगांत घालोन टोप डोईस घातला. मग येऊन देवदर्शन घेतलें. बिचवा, वाघनख नवटांकी तरवार मजबुतीनें घेतली. सर्व लोकांस सावधान करून गडावर बंदोबस्ती केली. आऊ साहेबांचे पायांवर डोकी ठेविली. मातोश्रींनीं विजयी व्हावें असा आशीर्वाद दिला. सारे सरदार गुजर, महाडीक, पानेकर, निंबाळकर, निराजीपंत, निळोजीपंत, मोरोपंत, उमाजी व रावजीपंत या सर्वांस निरवणूक करून शिवाजी राजे यांस हातीं दिलें. जिवा माहाली यास दरवाजावर ठेविलें. खान खिजमतगार व भोई दूर ठेवून कृष्णाजी भास्कर व दत्ताजी गोपिनाथ यांसि घेऊन सदरेस येवून लोडाजवळ बसले. दत्ताजी गोपिनाथ याणें पुढें जाऊन महाराजांस विनंति केली जे, खान येऊन सदरेस बसले. महाराजांनीं मजबुतीनें भेटीस चलावें. बिचवा, वाघनख, नवटांकी तरवार, घेऊन खानासमोर येऊन सलाम केला. उभे राहिले. खानानें कृष्णाजी भास्करास हेच शिवाजी राजे म्हणोन तीन वेळां पुशिलें आणि बोलिला कीं, तुम्ही पातशाही उमराव असोन किल्ले घेतां, मुलूख मारितां, खजीना लुटितां हें काय आहे ? महाराजांनीं उत्तर केलें कीं किल्ले कोट आपणच घेतले. खजीना मोगल नेत होता तोही आपणच लुटून सदर जागा केल्या. खान बोलला आमचे किल्ले घेतले आहेत ते आमचे हवालीं करणें.

४. हरोळी=पिच्छाडी.

अनुक्रमणिका

पातशहांनीं तुम्हांस बोलाविलें आहे. हुजूर घेऊन जाऊं. महाराजांनीं जाबसाल केला कीं पातशाई परवाना कोठें आहे ता दाखविल्यावर हुकूमबरदार असों. त्याजवरून खानाचा दिवाण बोलिला कीं खानाचा दस्तेंपंजा शिरीं घेऊन तखसीर माफ करून घेणें. महाराज बोलले जे, खान पातशाईचाकर, आम्हांस माफ कां करतील ! असो. तत्रापि तुम्ही म्हणतां तरी आम्ही खानाचे पोटांत डोई घालितों, त्यांनीं तखसीर माफ करावी. असें बोलोन खानास भेटले. खानानें महाराजांस बगलेमध्यें दाबून कटार चालविली. आंगांत शिलेपोस होता सबब कारेगीर जहाली नाहीं. महाराजांनीं अगदीं पिळोन बिचवा चालविला आणि वाघनखाचा मार डावे हातें केला. पोट फोडून कोथळा बाहेर काढिला आणि महाराजांनीं आपणांस सोडवून घेतलें. खानानें शालेनें पोट बांधून महाराजांवर फिरंगीचा हात टाकिला तो वार कारेगर न जाला. टोप तुटोन गव्हांप्रमाणें लागलें. त्यावर महाराजांनीं पट्याचा हात चालविला. खानाचे दोन भाग केले. शेख जवळ पठाण होता तो आडवा धांवला. त्यासि तानवाजी मालुसऱ्यांनीं जवळ करून ठार पाडिला. कृष्णाजीपंत दिवाण यांणीं महाराजांवर हात टाकिला. राजे बोलिले कीं ब्राह्मण तूं. असें समोर उभें न रहाणें. ब्राह्मणहत्या घडेल. इतक्यांत जिवा माहाली यांनीं त्यासि तरवारीनें ठार केलें. येसो निकम येऊन महाराजांस माघारें करून आपण पुढें जाला. तों इतक्यांत भोई शिताफी करून खानाचा मुर्दा पालखींत घालून पळूं लागले. येसा निकम धांवून भोयांच्या कुंच्या मारून आणि शीर कापून शीर व मोत्यांचा तुरा घेऊन आला. संभाजी व कावजी वगैरे चाळीस असामी गर्तेत गडबड ऐकतांच बाहेर धांवून आले. चपेटीस दत्ताजी गोपिनाथ सांपडले. त्यांसि ही दोन चार वार जाहले. बळखलें नाहीं. महाराजांनीं त्यांस वोळखून रक्षिले. मोगलाचें शीर घेऊन गडावर गेले. त्यानें श्रीतुळजापूरचे भवानीस उपद्रव केला होता म्हणोन शीर दरवाज्यावर बांधिलें. बुरजावर इशारत केली, तोफा सुटल्या. फत्ते जहाली. मावळे लोकांस इशारत होती च. ते लष्करांत उतरल्यावर

---

४५. दस्तपंजा=अभयहस्त.

४६. तक्शीर=अन्याय.

४७. कारेगार=लागू.

४८ फिरंग=तरवार.

४९. येसा निकम हें नांव मोडी लिपींत लिहिलें असल्यामुळें व त्या लिपींत क आणि म व जी आणि नी यांचे सादृश्य असल्यामुळें येसाजी कंक असा भ्रम होऊन प्रांट डफचे इंग्रजी इतिहासांत हा नांव छापलें गेलें आहे. परंतु खरें नांव येसा निकम आहे असें पुष्कळ हस्त लिखित मोडी प्रतींवरून दिसतें तसेंच दत्तोजीपंत याबद्दल पंतोजीपंत असें मोडी लिपींतील द व प यांचे सादृश्यामुळें झालेलें आहे.

५०. दशा करून [ पाठांतर ].

घाटा बांधून सावध च होते. जमा होऊन सर्व लष्कर बुडविलें. लूट माफ केली होती. बारा हजार घोडे पागेस आले. निशाणनगारे व हत्ती हुजूर घेतले. अफजूलखानाचा कबिला व पुत्र कोयनाकांठानें पळून गेला. बांईस जुणगें ठेविलें होतें तें लुटून तोफा वगैरे गडावर आणिलें. खंडोजी खोपडा रोहिलीकर जीवें मारिला. जिजाऊस जाऊन भेटले.

दत्ताजी गोपिनाथ यांस इनाम दोन लक्ष होन व मौजे हिवरें तालुके कोरे-पठार प्रांत पुणें नजीक सासवड हा गांव इनाम दिला. अद्यापि त्यांचे वंशास हें अन्न चालत आहे. मोरोपंतास पेशवाई दिली. रावजीपंतास राजापूरचा सुभा होता त्यांजपाशीं राजश्री बाळाजी आवजी प्रभु शहाणे लिहिणार पाहून रावजीपंतीं फडनिशी व चिटणिशी सांगितली होती. कागदपत्र त्यांचे हातचे हुजूर जाऊं लागले. त्यांचे लिहिण्यावर व मजकुरावर महराज संतोष जाहले. असा लिहिणार हुजूर आपल्याजवळ असावा ह्मणोन बोलले. रावजीपंतांस एक दोन वेळां लिहिलें कीं, तुह्मांजवळ ब्राह्मण परभु कोण लिहिणार आहेत ते हुजूर पाठविणें. त्याउपर महाराजांची स्वारी राजापूरें प्रांतीं जाहाली. तेव्हां रावजीपंत येऊन भेटले. ते समयीं समक्ष बोलले जे, पंतीं इतका लिहिणार आम्हांस दिलाच पाहिजे. त्याजवरून रावजीपंतांनीं राजश्री बाळाजी आवजीस आणोन महाराजांस भेटविलें. महाराजांनीं त्यास चिटनिशी सांगितली. घोडा शिरपाव बक्षीस देऊन राज्यकारणीं लिहिण्याची घडामोड त्याचे हातांनीं घेऊं लागले. बहुत संतोष जाहाले. अंतस्थ राजकारणादिक कामें निघालीं [तीं] ते करूं लागले असतां सर्व कारकुनांस अचंबा वाटला. ते द्वेष करूं लागले. कोणेही प्रकारें याचा बदनैक्ष होऊन नाश व्हावा हें चित्तांत आणिलें. ही बातमी महाराजांस कळली. त्याजवरून महाराजांनीं बाळाजी आवजीस ताकीद केली जे भोजनास कोणा एकाचे घरीं विश्वास धरून गेलां तरी तुमचा मुलाहिजा होणार नाहीं. असें समक्ष सांगितलें. हें वर्तमान सर्व कारकुनांस कळल्यावर एकत्र होऊन विचार केला कीं, याजवर महाराजांची पूर्ण कृपा आहे. आपण द्वेष केल्यास उपयोग नाहीं. असें म्हणोन त्याशीं सख्य पाळिलें.

राजश्री दलपतराव पोतनीस सरदेशमुख मामले रावेरीस आले. ते चऊल-पर्यंत पोहोंचले. तो महाराजांपुढें कांहीं अक्कल न चाले. ह्मणोन त्यांनीं रायबागी-

५१. राजापुरावर स्वारी इ० स० १६६० त झाली.

५२. बदनक्ष=फजिती.

५३. मुलाहिजा=क्षमा.

५४. रायबागीण=ही माहूरच्या उदाराम नामक देशमुखाची स्त्री. हिचा नवरा अवरंगजेबाचे तर्फेनें त्याचे भावाशीं युद्ध करीत असतां इ० स० १६५७ चे सुमारास मरण पावला. तेव्हां ही मोठ्या शौर्यानें लढली. म्हणून अवरंगजेबानें तिला राय-

ण कुमकेस आणविली. ती पेणचे मार्गे येणार हे वर्तमान महाराजांस जाहीर जाहालें. त्याजवर उमरखेडचे मार्गे पांच हजार बरकंदाज ठेवून मार्ग बंद केला. हाटेलैकर व राजगडकर पाटील व येशवंतराव व मानाजी व विश्वासराव हातमुलैकर व दिनकरराव यांस हुकूम केला कीं, उमरखेडचे मार्गे रायबगीण येत आहे तिजला बुडविणें. तुमची सर्फराजी होईल. तों रायबगीण उमरखेडास आली. पुढें सर्वत्रांनीं मिळून भोंवता वणवा लावून लष्कर सर्व बुडविलें. रायबगीण धरून आणिली. ती बायको. तिजला काय मारावी म्हणोन वस्त्रें जवाहीर देऊन औरंगाबादेस पोंचवून दिली. नामदारखान यांनीं पळून जावें असा विचार केला तेव्हां महाराजांनीं मिरा डोंगर धरून घाट बंद केला. हें वर्तमान नामदारखान यासि दलपतरायांनीं सांगितलें. नागोठणें याचे बंदरावरून पेणचे मार्गे खान कल्याणावरून पळून गेला. कुल दक्षणेस विजापुरीं उमराव होते त्यासि दहशत पडली. महाराजांचें यश बहुत वाढलें. किल्ले सातारा व चंदन व पन्हाळा वगैरे गड तहद विशाळगड खेळणा व रांगणा, प्रसिद्धगड, भिलगड, तहद सोंध्याचे सरदे पावेतों गड घेऊन खुद्द राजे पन्हाळियास राहिले.

अफजूलखानाचा लेंक फाजलखान पळाला होता तो विजापुरास फकिरी घेऊन पातशाहापाशीं गेला. पातशाहास बोलला कीं, माझे बापाचा सूड घेणें. त्याजवरून पादशहांनीं कुल सरदार बोलावून ऐशी हजार फौज अफजूलखानाच्या पुत्रासमागमें शिद्दी बिलावल वगैरे तोफा देऊन रवाना केले. त्यांनीं येऊन पन्हाळियास वेढा घातला. महाराज यांनीं सात आठ हजार मावळे घेऊन रात्रीस गडाखालीं उतरून मोरचे मारिले. कडतोजी गुजर होता त्याचें नांव प्रतापराव ठेवून सरनोबती सांगितली. कितीएक दिवस भांडत असतां पठाण गडाखालीं होता. डोंगर होता त्यावर तोफा चढवून मारगिरी करूं लागले. तो मार किल्ल्यावर येऊं लागला तेव्हां त्रिंबक इंगळा बोलूं लागला कीं, महाराजांनीं येथें राहूं नये. बाहेर उपराळा करावा. तें ऐकोन वीस हजार मावळे गडावर ठेवून महाराज चाळीस हजार मावळे बराबर घेऊन चालले. तेथून विशाळगड तीन कोस होता. तो दूर राहिला. प्रातःकाळ जाहाला. यवनाची फौज चंद्रज्योती लावून मार्ग काढीत पाठीवर आली. खिडीज-

---

बागीण हा किताब देऊन तिची देशमुखी तिजकडे ठेविली. हिचा मोड शिवाजी महाराजांनीं इ० स० १६७० त केला.

५५. होलटकर (पाठांतर).

५६. हातनुलकर (पाठांतर).

५७. इ० स० १६६० त पन्हाळ्यास विजापूरकरांनीं वेढा दिला.

बळ महाराजांस आटोपिलें. राजश्री बाजी परभु धारकरी हिमतीचे माणूस होते त्यांस बोलावून पुशिलें कीं, आतां कसें करावें? मशारनिल्हेनीं उत्तर केलें कीं, महाराजांनीं निघोन जावें. मी येथें राहतों. त्यांसि खिंड चढूं देत नाहीं. महाराजांनीं गडावर तोफांचे आवाज करावे. तोंपर्यंत यांशीं युद्ध करून फौज येऊं देत नाहीं. साहेबकामीं पडलों तरी मुलांलेंकरास अन्न देणार महाराज आहेत. असें बोलून निम्मे मावळे घेऊन खिंडीजवळ येऊन उभा राहिला. तेथें युद्ध मोठें जाहलें. शिद्दी बिलावल व फाजलखान यांस खिंडीजवळून माघारें सारिलें. खिंड चढों न दिली. तों महाराज गडावर पोंचून गडावर तोफांचे आवाज दोन केले. ते ऐकून बाजी परभु हुशार जाहले कीं, आतां हा जीव गेला तरी चिंता नाहीं. फाजलखान व शिद्दी बिलावल व सरजाखान यांनीं मोठा लगट करून तुंबळ युद्ध केलें. बाजी परभु जखमी जहाला. सातआठशें मावळे कामास आले. बाजी परभु जखमी होऊन रणांत पडतांच कांहीं एक सांभाळून डोंगरांत गेले. फौज खिंड चढून विशाळगडाखालीं आली. तों पाणी नाहीं. जागा *कुंबल पाहून दोनचार घटका उभे राहून पन्हाळियास गेले. तेथें वेढा घालून बसले. यांनीं छापा घालून फौज सर्व बुडविली. असा विचार पाहून कुल फौज उठोन गेली. महाराजांनीं बाजी परभु आदिकरून मावळे जखमी जहाले होते त्यांसि आणोन जखमा बऱ्या केल्या. विजापूरच्या फौजेनें पायमल्ली जाहाली सबब मुलकास कौल दिला. खराबा जाहला सबब राघो बल्लाळ अत्रे यांसि सुभा सांगितला. मुलखाची वस्ति केली. दिल्लीचे पादशहास खबर पोंचली.

यानंतर शास्तीखान ऐंशी हजार स्वारांनिशीं रवाना केला. तो मुलुख मारीत किल्ले घेत पुण्यास येऊन राजवाड्यांत राहिला. महाराज गडास होते. तेथें खबर आली कीं, मोगल येऊन राजवाड्यांत राहिला. हें ऐकोन बहुत कोपाविष्ट जहाले. विश्वासु लोकांस समागमें घेऊन तीनशें लोकांनिशीं वाड्यावर गेले. जागजागां बैलांचे शिंगांस व झाडांस पोत बांधिले. सर कारकुनास निरवणूक केली. निदान समीप आहे तुम्ही खबरदार रहाणें. मोगलाची फौज आली तरी चुकस न खाणें. राजश्री शामराज पंतासमागमें बारा हजार मावळे लोक देऊन पाठीवर कुमकीस ठेविलें. शिड्या लावून वाड्यांत उतरले. चौकीचे लोक होते ते मारून महालांत गेले. शास्ताखान निजला होता. त्याजवर तरवारीचे वार केले. तों बायकांनीं दिवे मालवून त्याजवर पडून जान-

---

५८. हा हिरडस मावळचा देशपांड्या होता.

५९. शास्ताखान इ० स० १६६२ त दक्षिणेंत आला व इ० स० १६६३ त शिवाजीनें त्याचीं बोटें छाटिलीं.

* कुंबल=कांटेरी झुडपांनीं आच्छादिलेली.

रात नेला. तरवारीचे वारानें हाताचीं बोटें तुटोन जखमी जाहला. त्या सारखा काजी होता तो मारिला. लष्करांत आवाई जाहली होती. पोत जागाजागां बांधिले होते. ते उजळून फौज तमाम तयार होऊन हिलालांवर धांवूं लागले. तेव्हां महाराजांनीं सर्व पाहून नदी पलीकडे स्वार व लोक ठेविले होते त्यांत जाऊन किल्ले कोटांत गेले. दुसरे दिवशीं शास्ताखान कूच करून दिल्लीस गेला.

तदनंतर सुरत मारावी असा विचार करून सर कारकून व सरदार व मावळे आदिकरून जमीयत करावी ती करून सुरत[६०] मारिली. बहुत मत्ता हातास लागली. सोनें, रुपें, मोतीं, दौलत, व नक्ताखेरीज दुसरा ऐवज घेतला नाहीं. महाराज तिकडे गेल्यानंतर मागें बाजी शामराज विजापुराहून फौज घेऊन महाल गोरेगांव पावेतों आले. महाराजही सुरत मारून माघारे आले. हें ऐकोन विजापुरास पळोन गेले. महाराज महाडास येऊन दाखल जाले. तेथें घोड्यांची पहाणी करून दत्ताजीपंतास फडणिशी सांगितली. तदनंतर नित्य नेम मनास आणोन धर्मन्याय चालावे असें चित्तांत आणोन ब्राह्मणांस वर्षासनें करून दिलीं. येविशीं अधिकारी पाहिजे म्हणोन रघुनाथ भटास पंडितराई सांगितली. निराजीपंतास न्यायाधिशी दिली. वाराणशी पावेतों धर्मकीर्ति केली. क्षेत्रोक्षेत्रीं ब्राह्मणांची संस्था केली. देवस्थानांस जागजागीं नंदादीप व नैवेद्य सरकारांतून करून दिले. मुलुखगिरीस[६१] जमादार व सुभेदार व मुजुमदार व हवालदार नेमून दिले. ब्राह्मणांस सुभे व परभूंस मजुमी नेमिल्या. महालोमहालचे हवाले परभूंस व किल्ल्यांचे हवाले मराठे यांसि व कारखाननिशीचीं कामें परभूंस अशा नेमणुका करून दिल्या. राज्याचा बंदोबस्त करून वर्तणूक करूं लागले. गडास दहा रजपुतांस एक नाईक, तिघां नायकांसि एक तट्टू, सर जावत्यांत मशाल करून दिली. जेथील तेथील बंदोबस्ती याप्रमाणें करून दिली. *हशम लोकांस सबनीस परभू नेमून दिला. व इमारतीस ब्राह्मण मजमदार करून दिला. किल्ल्याच्या इमारती चालविल्या. पाय लोकांचे जुमले केले. हिरोजी फर्जंद यांसि कुल इमारतीचें काम अखत्यारितें सांगितलें. नागोजी ससोर यांस फर्जंदांची सरदारी सांगितली. असा एक विचार करून एकास एक वर्म करून ठेविलें.

औरंगजेब पातशहास खबर गेली. त्यांणीं दिल्लीस जाते समयीं मोहकमसिंग रजपूत दहा हजार फौज देऊन सरंजामासुद्धां औरंगाबादेस ठेविला

---

६०. तारीख ५ जानेवारी इ० स० १६६४ या दिवशीं सुरत मारिली.

६१. मुलुखगिरी–स्वारी.

* हशम=लवाजम्याचे लोक.

होता त्यासि हुकूम केला कीं, शिवाजीवर मोहीम करणें. त्याजवरून तो फौज सुद्धां चालोन आला. त्याजवर महाराजांनीं प्रतापराव गुजर सेनापती वीस हजार फौजेनिशीं रवाना केला. उभयतांचें युद्ध जाहलें. मोहकमसिंग युद्धांत खस्त जहाला. फौज तमाम बुडवून दहा हजार घोडे आणिले. हें वर्तमान दिल्लीस कळल्यावर पादशहांनीं मिर्जा राजा जयसिंग व दुलेलखान पठाण यांस हुकूम करून जमाव सुद्धां रवाना केले. ते मजल दरमजल दक्षणेस आले. तों राज्याची बहुत सक्ती देखिली आणि असें दिसोन आलें कीं, शीपाईजनाची आंगेजणी थोर. शास्तेखानाचे डेऱ्यांत एक ठेवून मारामारी केली. अचाट कर्म करितात. यांजपुढें आपली मर्दुमकी चालणार नाहीं. असें चित्तांत आणोन सख्य घडोन भेट घ्यावी या अर्थी अनुष्ठानें करविलीं आणि मजल दर मजल पुण्यास आले. दुलेलखान मनसबदार पातशाई होता. त्यासि न कळतां मिर्जा राजा जयसिंग यांणीं सांगोन पाठविलें कीं, दिल्लीचा राजा थोर आहे. त्याशीं द्वंद्व कामाचें नाहीं. तुम्ही व आम्ही हिंदु आहों. आम्हांपासून कृत्रिम होणार नाहीं. तुम्ही पातशाहाचे भेटीस निःशंक येणें.

हें वर्तमान दुलेलखान यांस कळल्यावर बहुत कोपिष्ट होऊन बोलिला कीं, तुम्ही व ते एक जाहालां. [नंतर] तेथून कूच करून जाऊन पुरंदरास वेढा घातला. किल्ल्यावर जाऊन हल्ला केला. तेथें नामजाद मुरार दादाजी* परभु होते. त्यांजबरोबर मावळे लोक एक हजार, त्यांतील सातशें माणून मुरार दादाजी घेऊन खानाचे डेऱ्या पावेतों मारीत गेले. शर्थ केली. मावळे बहुत मारिले. बहुतांनीं वेढा घातला. निदान समय प्राप्त जाहाला. हें मुरार दादाजीनें जाणून खानाचे डेऱ्यावर जाऊन चालून घेतलें. पांचशें पठाण ठार मारिले. खासा देवडी सोडून बाहेर आला. तों मुरार परभूनें जातीनें च ढालफिरंग सांभाळून खानाशीं गांठ घातली. खान बोलला कीं, तूं शर्थ केलीस. तूं कौल घेणें. तुझी सर्फराज केली जाईल. मुरार दादाजी बोलिला जे, मी महाराजांचा सरदार तुझा कौल काय सबब घेईन ! म्हणोन शिताफीनें धांवून खानास आटोपिलें. तों खानानें तिरानें बाण मारिला. मशारनिल्हे समागमें तीनशें माणूस ठार पडलें. पांचशें संभाळून किल्ल्यावर गेले. खानानें लगट करून रुद्रमाळेवर तोफा चढविल्या. मारगिरी करूं लागला. लोकांनीं हिम्मत धरून विचार केला कीं, ज्याप्रमाणें सरदार पडला त्याप्रमाणेंच आम्हीं जिवंत असतां किल्ल्यावर येऊं देणार नाहीं.

---

६२. मिर्जा राजा जयसिंग व दिलेलखान हे इ० स० १६६५ त दक्षिणेंत आले.

६३. पुरंदरास वेढा इ० स० १६६५ त पडला. * कांहीं बखरींत "दादाजी"चेबद्दल "बाजी" असें आहे.

इकडे महाराजांनीं विचार केला कीं, किल्लयावर लोकांचे कबिले आहेत ते बेहिम्मत जाहाल्यास किल्ला जाईल. लोक मारले जातील. हें जाणोन मिर्जा राजा यांचा विश्वास धरून त्यांचे भेटीस गेले. बराबर आनंदराव व निराजीपंत व नागोजी फर्जंद व बहीरजी फर्जंद व कृष्णाजी जोशी व विश्वासराव असे घेऊन आपण साधा पोषाख केला. वरकडांस तुरे व चौकडे व जडीत कडीं व मोत्यांच्या माळा व जवाहीर देऊन घोडे शिपाई व जीन जरीचें व सोन्याचे गंडे पट्टे कलग्या लावून बराबर घेऊन गेले. महाराजांचे मनांत विकल्प आला कीं, मिर्जा राजाच्या डेन्यास जातों. मजलसीवर भेटेल किंवा सामोरा येईल कीं, जेणें करून आपली बाजू हलकी पडेल असे म्हणून पुढें गेले तों मिर्जा राजा सामोरा येऊन भेटी जाहाल्या. देघे एका मजलसीवर जाऊन बसले. आनंदराय महाराजांचा जोडा घेऊन उभे राहिले. तमाम मोगलाचे उमराव व मसलतदार मजलसींत बसले होते. त्यांणीं आश्चर्य केलें कीं, इतका कुळवान, वरकड बारगीर लोकांचे पोषाख व घोड्याचें सामान पहातां दंग जाहले. मिर्जा राजा व महाराज खलबतास गेले. तह जहाला. व क्रियाप्रमाण जाहलें. पुरंदरचा वेढा उठविणें म्हणोन सांगितलें. त्याजवरून त्यांणीं दलेलखानास सांगून वेढा उठविला. तहामध्यें *सत्तावीस किल्ले पादशहास दिले. मिर्जा राजा यांनीं पातशहास लिहून पाठविलें आणि महाराजांस मनसब आणविली. जागीर वराडांत दिली.[६१]

महाराजानीं मिर्जा राजास सांगितले कीं, रेवदंडा राजपुरी निजामशाई किल्लेदार किल्ला बळकावून बसला आहे. आम्हांस येऊन भेटत नाहीं. हबशी जबरदस्त आहे. त्याशीं बोलावून आणावें आणि किल्ला मागावा. त्याजवरून मिर्जा राजे यांणीं हबशी यासि बोलावून विचार मांडला. शिदी खैरू, शिदी संबुल, शिदी याकुत हुजूर येऊन रुजू जाहले. त्यासि हुकूम केला कीं, जंजिरा खालीं करून शिवाजी राजे यांसि देणें. त्याणें उत्तर केलें कीं, किल्लेदार पातशहा हुकुमाखेरीज देत नाहीं. त्याजवरून हुजूर लिहून हुकूम आणविला. परंतु आला नाहीं. हबशी यांसि इजाफा सुरतेवर पातशाई तनखा करून दिला आणि नशरतशाई व जाफरशाई जहाजें दोन व गुराबा तीन व गलबतें पंचवीस करविलीं आणि आरमाराचा सुभा शिदी संबुल यासि सांगितला. आरमार

---

* वस्तुत: बत्तीस किल्लयांपैकीं वीस किल्ले बादशाहानें आपणाकडे ठेविले व बारा किल्ले शिवाजीला दिले ते येणेंप्रमाणें:– १ राजगड, २ तोरणा, ३ रायरी, ४ लिंगाणा, ५ म्हारगड, ६ बालागड, ७ घोसाळा, ८ ईश्वाडी, ९ पाली १० भूरप, ११ कोयरी, १२ उदेदुर्ग.

६१. वऱ्हाडांत जाहागीर इ० स० १६६७ त मिळाली.

व जंजिरे यांसि मुरतेवर दोन लक्ष रुपये दिले. महाराजांनीं हें मान्य केलें.

तेव्हां मिर्जा राजे यांसि महाराज बोललें कीं, हुजूर पातशाहाची मुलाजमत जाहालियावर राजपूर जाहागीर पातशाहापासून देवविणें. त्याजवरून मिर्जा राजे यांसि पातशाहाचा हुकूम आला कीं, शिवाजी राजे यांसि हुजूर पाठविणें. त्याजवरून रामसिंग हांडे समागमें देऊन राजे यांसि पातशाहाकडे रवाना केले. महाराज संभाजी राजे यांस समागमें घेऊन चालले. पातशाहास मुजरा करणार नाहीं म्हणोन बोलले. त्याजवरून रामसिंग बोलिला कीं दिल्लीचा पातशाहा सार्वभौम थोर आहे. त्यासि मुजरा करावा. तदनंतर मुलाखतीस गेले. पातशाहांनीं आपल्या पुढें कमाना बांधिल्या. कुर्नीस करावी तों महाराजांच्या डोईवर हात धरिला. त्याचे हातावर मारून कुर्निस करून पुढें गेले. दिवाण पांचहजारी ज्या जागियास उभे रहातात त्या जागीं यांसि उभे करूं लागले. तो मनांत विषाद आणोन त्या स्थळीं बसले. रामसिंग आडवा जाहला व दिवाण आडवा उभा राहिला. पातशाहांनीं रामसिंगास नजरेनें इशारत केली कीं हें काय ! पातशाहाचे कचेरीस कोणीही बसत नाहीं. तेव्हां पातशाहास रामसिंगानें अर्ज केला कीं यानें पातशाई दरबार पाहिला नाहीं. त्याजवरून हुकूम झाला कीं डेऱ्यास घेऊन जाणें.

तेथून डेऱ्यास आल्यावर पातशाहा बहुत दंग जाहाला. डेऱ्याजवळ पोलादखान याची चौकी ठेविली. ती चौकी पाहून महाराज बोलले कीं, पातशाहाची इतराजी जाहाली उपाय काय करावा ? तेव्हां रामसिंगाकडून अर्ज करविला कीं नजर आणविली आहे. त्याजवरून पातशाहांनीं माफ असे म्हणून बोलिले. दुसरा अर्ज करविला कीं मनसबदार व उमराव व मुत्सदी यांस कांहीं कोंकण प्रांतीचा मेवा कावडी भरून आणिला आहे तो पोंहोचवून द्यावा लागतो त्याचा हुकूम काय ! तेव्हां पातशहा बोलिले कीं ज्यास जें देणें असेल तें द्यावें. तेव्हां मिठाईचे पेटारे भरून कावडींत घालून मनसबदारांचे घरोघर पाठवूं लागले. दररोज पेटाऱ्यांची रहदारी लाविली. चौकीदारांनीं एकदोन वेळां झाडा घेतला. मिठाई आहे असें त्यांणीं पुरतें जाणून झाडा घ्यावयाचा टाकिला. पुन: अर्ज केला कीं शरीरास स्वस्थता नाहीं याजमुळें तीन घटका पावेतों निद्रा करितों. याप्रमाणें सांगोन पाठविलें. चौकीदारांस म्हणों लागले कीं, तुम्हीं मुसलमान आम्ही हिंदु आमचा धर्म चालत नाहीं आणि शरीरास स्वस्थता नाहीं. समीप न राहावें. बाहेर बसत जावें. कांहीं द्रव्य त्यांस देऊन बाहेर बसत ऐसें केलें. बरोबर कारकून व लोक होते त्यांस अगोदर च निरोप देऊन रवाना केले होते. निराजीपंतास व दत्ताजीपंतास ठिकाण करून ठेविलें. आ-

अनुक्रमणिका

पण व पुत्र कावडींत बसोन गुजरीचे वेळेस सायंकाळीं बाहेर जाऊन पेटारें जाळिले आणि निराजीपंतास व दत्ताजीपंतास सावध करून विचार केला कीं आल्यामार्गानें दगा आहे. तो मार्ग टाकून कुरुक्षेत्रास चालिले.

मागें बहिरजी भिजदास याजला आपला पोषाख देऊन पलंगावर निजविला होता. तो प्रातःकाळीं उठोन बाहेर निघाला. चाकर पोरगा पाय दाबीत होता त्यास चवकीदारानें पुसलें कीं महाराज काय करितात ? त्यानें उत्तर केलें कीं कपाळ दुखतें याजकरितां निद्रा केली आहे. पलंगावर लोड तकिये घालून वरती पांघरूणें टाकून बाहेर निघतां व बोलिला कीं डोकें दुखतें गलबला न करणें. इतकें म्हणून बोलून गेला. चवकीदारांनीं चार घटिका राहून पाहावयास लागले तों ठिकाणीं कोणीच नाहीं. त्याजवरून हुजूर अर्ज पोंहोचविला कीं, शिवाजी राजे पळोन गेले. दोन प्रहर पावेतों होते. आतां दिसत नाहींत. तदनंतर फौजेस हुकूम करून गुर्जबरदार रवाना केले. जेथें सांपडतील तेथून दस्त करून आणणें म्हणोन सांगितलें.

त्यावर रात्रीचा दिवस करून बैरागी याचें सोंग धरून मथुरेस गेले. तेथें कृष्णाजीपंत व काशीपंत व विसाजीपंत हे त्रिवर्ग बंधु होते. त्यांची व निराजीपंताची वळख होती. त्यांजकडे जाऊन त्यांचें एकांतीं दर्शन घेतलें आणि वर्तमान सांगितलें. त्यांणीं कबूल केल्यानंतर त्यांचे घरीं संभाजी राजे यांस ठेविलें. त्यांणीं आपले मुलासमागमें विद्याभ्यास करविला. त्यांस सांगितलें कीं आम्ही आपले देशीं जाऊं. मंतर तुम्हांस सूचना करूं तेव्हां घेऊन येणें. त्यांतील एक बंधु कृष्णाजीपंत समागमें घेऊन वाराणशीस गेले. तेथून गोंडवाणाचे मुलखांतून भागानगराकडून आपले देशास आले. मार्गीं कितेक दगे जाले. तेथें नानाप्रकारचे बहाणे समयोचित करून श्रीकृपेकरून आपले राज्यांत दाखल जाले.

त्याजवर एका वर्षानंतर मथुरेस माणसें पाठविलीं आणि राजश्री काशीराव व विसाजीपंत व संभाजी राजे यांस बोलाविलें. काशीराव व विसाजीपंत यांणीं संभाजी राजे यांस ब्राह्मणाचा वेष उत्तम देऊन सहकुटुंब येतांना मार्गीं चौकीवर चाऊल जाली कीं संभाजी राजे यांजला ब्राह्मण नेतात. तेव्हां उभयतांनीं निराकरण करून दहींपोहे त्रिवर्ग पंतांनीं एक स्थळीं भक्षिले आणि घेऊन आले. दर्शन होतांच साखरा वांटिल्या. धर्म बहुत केला. त्रिवर्ग पंतांस "विश्वासराय" किताब दिली. होन एक लक्ष बक्षीस दिले. नांवाजून आपल्या संनिध ठेविले.

त्याउपर तहामध्यें सत्तावीस किल्ले मिर्जा राजे यांस दिले होते ते माघारे

---

६५. इ० स० १६६६ चे मार्च महिन्याचे आरंभीं दिल्लीस जावयास निघाले व त्या वर्षींचे दिसेंबर महिन्यांत परत येऊन दाखल झाले.

अनुक्रमणिका

ठुशीसगट तन्मणी शुभद सूत्र पेट्या गळीं ।
जनांसि प्रतिबिंबल्या बसति देवता या जळीं ॥
विचित्रतर कंचुकी धरिति ज्यां कशीदा वरी ।
जरीपदर त्यावरी दिसति अप्सरांच्या परी ॥ २८५ ॥
जळीं करुनि पूजना विपुल कुंकुमा टाकिती ।
असोनि जल शुभ्र तें दिसति लाल लाटा किती ॥
जन भ्रमति प्रत्यहीं अरुण तोय तें पाहतां ।
पहा म्हणति जाहली प्रगट भारती ही अतां ॥ २८६ ॥

**वृत्त भुजंगप्रयात.**

करीं झारि शोभे जिच्या सोनियाची, निघे सुंदरी चाल जैशी गजाची ॥
फिरोनी करी स्वर्नदीवंदनाला, चढे घाट गालावरी घाम आला ॥ २८७ ॥
हतीं पूजनद्रव्य घेवोनि तार्टी, सखी वाट पाहे उभी एक घाटीं ॥
दुजी चालली कुंभ घेवोनि नारी, मुखें नांव घे शर्व शंभो पुरारी ॥ २८८ ॥

**वृत्त शार्दूलविक्रीडित.**

नेसे शुभ्र पटी गळां हनुवटी गालासि लावी उटी
घे तीं सिंहकटी बृहत् कटितटीं गंगाजळाची घटी ।
चाले पंचवटीस पार निकटीं भागीरथीचे तटीं
पूजोनी सुवटीं विधी हरि जटी देवा नमी शेवटीं ॥ २८९ ॥

**वृत्त भुजंगप्रयात.**

सुता स्नान घालोनियां एक माता, म्हणे वंदनाला करीं ईस ताता ॥
करी बाळ भागीरथीवंदनाला, कटीं घे तया फार आनंद झाला ॥ २९० ॥
कटीं बाळ एके हतीं दिव्य झारी, चढे घाट मैत्रीणिला हाक मारी ॥
मृगाक्षी करीं घेउनी अक्षमाळा, प्रदक्षीण कोणी करी पिंपळाला ॥ २९१ ॥
असे कुंभ कांखेस गंगाजळाचा, डबा त्या च हातीं निशाकुंकुमाचा ॥
दुज्या हातिं घेवोनि तांब्या निघाली, तटाकीं सती पिंपळा पाणि घाली॥२९२॥

**वृत्त मालिनी.**

कलश धरुनि हातीं विप्रजाती घरासी
निघति वदनपद्मापासुनि मंत्रराशी ।
तटिनित टें किती ते वंदुनी जान्हवीला
करिति विमलगंगासंगमाच्या स्तुतीला ॥ २९३ ॥

**वृत्त वसंततिलका.**

नाहोनि सर्व जन यापरि माधवासी, यात्रेकरांसहित चालति क्षेत्रवासी ।

अनुक्रमणिका

जो घाट पंचनदिचा ह्मणवोनि रामा, तेथें वसे हरि जना करि पूर्णकामा॥२९४॥
सुस्नात मी तटिनिकांठिं विलोकिताहें, जो तोंवरी सुरमुनीस जळांत पाहें।
केले तया जवळ जाउनि वंदनातें, कौशल्यप्रश्न करि नारद तो हि मातें ॥२९५॥
स्नाना करोनि मुनि हाटककौपिनाला, नेसोनि घाली गळिं पांडुर अक्षमाळा ॥
कृष्णाजिनासि धरि प्रावरणार्थ अंगीं, वीणा करांत करि गायन त्या च रंगीं॥२९६॥
गावोनि भागीरथिगुण विचित्ररागें, गंगेसि भक्ति मज दे म्हणवोनि मागे ॥
श्रीविंधेनायपददर्शन घ्यावयासी, माझ्यासवें मुनि निघे मग स्वर्गवासी ॥ २९७ ॥

## वृत्त शार्दूलविक्रीडित.

गेलों घाट चढोनि नारदसवें वंदावया माधवा
झाला माधव मंदिरांत बघतां संतोष अत्युत्सवा ।
वीणातूर्यमृदंगनाद भरला गंधर्व गाती किती
पूजा चालल्लि विप्रवृंद करिती नाहीं तयाला मिती ॥ २९८ ॥
गंगातोय कितेक घालिति वरी सूक्तें मुखें बोलती
घंटा वाजति वाटली मज तदा वैकुंठभूमी च ती ।
कोणी वाहति तुळशी किती तया पद्में बकुली फुलें
कोणी अर्पुनि पारिजात नमिती भक्तीबळें पाउलें ॥ २९९ ॥
धूपामोद चहूंकडे पसरला चाले गवाक्षांतुनी ।
येती देव वरोनि त्यांसि गमला बोलावि हा जाउनी ॥
ओंवाळोनि घृताक्त दीप शतशा नैवेद्य त्या अर्पिती ।
पक्वान्नें रचिलीं अनंत असती ज्यांमाजि नानाकृती ॥ ३०० ॥
ऐसें पूजुनि लोकपाळपतिला पौराणिकांच्या मुखें ।
वेदांतादिकथाश्रुतीस करिती बैसोनि तेथें सुखें ॥
देवातें स्तविती कितेक नमिती गाती किती नाचती ।
झाला मंडप पूर्ण सर्व सुजनीं पोथ्या किती वाचती ॥ ३०१ ॥
आलों देव पहात तेथुनि अम्हीं तों घेउनी बैसले ।
जाई पाच गुलाब मालति जुई चंपादि माळी फुलें ॥
केले हारतुरे तसे च गजरे सद्विक्रयें द्यावया ।
चाले वास चहूंकडेस जहली दाटी तयां घ्यावया ॥ ३०२ ॥

## वृत्त उपजाति.

ताटें भरोनी सुमनांसि देती, माळी तयांपासुनि लोक घेती ॥
किती तुरे घेउनि पुष्पमाळा, जाताति द्याया जन भैरवाला ॥ ३०३ ॥
पदोपदीं रम्य शिवालयें तीं, पूजावयाला नरनारि येती ॥

पाहोनियां बेल फुलें शिवाला, वंदोनि त्या मागति दे शिवाला ॥३०४॥

वृत्त शार्दूलविक्रीडित.

कोणी पद्मशतें सहस्रकमलें वाही शिवार्चा करी ।
झाला ढीग अनंत पुष्पकमलें प्रत्येक लिंगावरी ॥
मार्गोमार्गीं सुगंध वास सुटला जाई जुई मोगरी ।
चांफा मालतिचा तसा बकुलिचा लोकांस सौख्या करी ॥३०५॥
मार्गीं वंदित शंकरासि निघतां ते बंगले देखिले ।
प्रत्येका नउ सात आठ मजले चित्रीं जसे रेखिले ॥
दोहींभागीं समान ऊर्ध्व दिसती त्यांला मण्यांचे सजे ।
जेथें बैसुनि सौख्य घेति ललना देवांगनांला न जें ॥ ३०६ ॥
सत्रांची वसती वरी च न तळीं ओलीमुळें राहती ।
कोणी सांगति वेद कोणि पढती कोणी स्वयें पाहती ॥
व्याकर्ण श्रुतिसार तर्क शिकती जेथें अनंतावधी ।
चाले मंगल सर्व ठायिं नगरी शून्या नसे ती कधीं ॥ ३०७ ॥
गंधी गंधपदार्थ मार्गिं विकती तद्गंध सौख्यासि दे ।
मेवाविक्रय हालवाई करिती तें दाविलें नारदें ॥
बुंदी बेसन मोतिचूर जिलिबी बर्फी बतासे खवा ।
पेढे साखरकानु माल भरला फेण्यादि सारा नवा ॥ ३०८ ॥
ऐसें सर्व पहात नारदसवें विश्वेशदेवालया ।
आलों ईश्वरदर्शनार्थ तंव तो रस्ता नसे जावया ॥
विप्र क्षत्रिय वैश्य शूद्र वनिता बैरागि दंडी यती ।
जाती येति अती च दाटि करिती पूजा किती वंदिती ॥ ३०९ ॥

वृत्त शिखरिणी.

वियन्मार्गें अंतर्गृहिं मजसि ने नारदमुनी ।
उभे होतों तेथें जंवरि शिवलिंगा प्रणमुनी ॥
दिसों लागे गंगाधरसतिपतीलिंग मजला ।
शुचिच्छायें तेव्हां हिमनग तसा ईश गमला ॥ ३१० ॥

वृत्त शार्दूलविक्रीडित.

स्नाना घालुनि रुद्रसूक्तशतकें जो केशरें चर्चिला ।
शोभे शंकर बेलपुष्पकमळीं विप्रव्रजें अर्चिला ॥
धूपें धूपित होय सर्व नगरी दीपप्रकाशें तदा ।
कैलासापरि भासलें स्थळ वसे विश्वेश जेथें सदा ॥ ३११ ॥

अनुक्रमणिका

ढक्का ढोल मृदंग शंख डमरू डिंडीम तूर्यें किती ।
वाद्यें वाजति नाकिं शब्द भरला नाहीं च त्याची मिती ॥
चाले वास चहूंकडे घमघमा नैवेद्य त्या अर्पिला ।
कर्पूरार्तिक दावुनी सुरपती सद्भक्तिनें तर्पिला ॥ ३१२ ॥
ऐसा उत्सव सर्व दावुनि मुनी त्या अन्नपूर्णे नमी ।
धुंडीभैरवदंडपाणिप्रमुखां देवांसि ही वंदुनी ॥
गेला स्वर्गपदासि नारद मला विश्वेश दृष्टी पडे ।
होतों तोंवरि नित्य काशिनगरीं यात्रा हि तैशी घडे ॥ ३१३ ॥

**वृत्त वसंततिलका.**

तापत्रयाग्निपरितप्त प्रपंचिं सारा, प्राणी फिरे परि सुखार्थ कुठे न थारा ॥
जाणोनि मोक्षसुख सर्व जनांसि द्याया, क्षेत्रांत देव करुणार्द्रव राहिला या ३१४
सांगूं किती तुज कृपा जगदीश्वराची, काशींत अंतिं कथि तारक मंत्र हा ची ॥
आहे असा कवण देव दयार्द्र ताता, वाराणसींत पतितांस हि मुक्तिदाता ३१५

**वृत्त उपजाति.**

देवांत विश्वेश पुरींत काशी, नदींत गंगा भवमृत्युनाशी ॥
असोनि ऐसें त्रय एक ठाया, कां व्यर्थ हे तापविती स्वकाया ॥३१६॥

**वृत्त वसंततिलका.**

एकेकलिंगमहिमा वदवे न शेषा, अद्यापि जाणुं शकला न विरंचि लेशा ॥
तेथें किती वद मती मज पामरासी, काशीपतीपदिं असोत प्रणामराशी ॥३१७॥

**वृत्त कामदा.**

दक्षिणेकडे काशिच्या असी, उत्तरेकडे वारुणा तशी ॥
देवसिंधुला मीळती नद्या, पाय पातकां सांगती न द्या ॥ ३१८ ॥
दक्षिणोत्तरा सीम काय ती, जाणुनी वसे सर्व ही यती ॥
अंतरीं नसे पापगंध ही, पांच कोस ती पावनी मही ॥ ३१९ ॥

**आर्या.**

त्या मध्यंतरक्षेत्रा पंचक्रोशी असें पहा नांव ॥
भवसागरा तराया वाटे ती ठेविली महा नाव ॥ ३२० ॥

**साकी.**

पांच कोस त्या अनंत असती तीर्थें गंगेमाजी ॥
ज्यांचें दर्शन घेतां हरती दुर्धर पातकराजी ॥ ३२१ ॥
पुढें फिरोनी पूर्व दिशेला स्वर्गतरंगिणि चाले ॥
कुदेश असतां गंगागमनें सुदेश अवघे झाले ॥ ३२२ ॥

सरयुगंडाकिनद्यांसि पोटीं घेउनि जातां गंगा ॥
मध्यें जन्हुनृप यज्ञ करीतां वेगें करि मखभंगा ॥ ३२३ ॥
जहला होता गर्व नदीला नाहीं वेग धराया ॥
समर्थ कोणी परि जन्हुनें घालविला तो वांया ॥ ३२४ ॥
योगबळें नृप नदीस प्याला तदैव गंगा प्याली ॥
मुक्त कराया आपणास ती जन्हूतनया झाली ॥ ३२५ ॥
मुखें सोडिली रायें तेव्हां जान्हविनांवा पावे ॥
सगरजांसि मग पूत कराया प्रेमें गंगा धांवे ॥ ३२६ ॥
ज्यांकरितां बहुश्रमें भगीरथ घेउनि गंगा आला ॥
पडले असती कपिलाश्रमिं ते पूर्वजलधितीराला ॥ ३२७ ॥
कपिलमुनीच्या नयनाग्नीनें भस्म जाहले जेथें ॥
साठ हजार सगर कराया मुक्त पावली तेथें ॥ ३२८ ॥

**वृत्त शार्दूलविक्रीडित.**

आली धांवत माय जेवि धरि ती तान्ह्या मुला पोटशीं
गंगा भस्म हि जाहल्या सगरजां पोटांत घेई तशी ।
गेले साठ हजार भस्म असतां स्पर्शें जिच्या मुक्तिला
रामा यास्तव नित्य नित्य सखया चित्तांत चिंतीं तिला ॥ ३२९ ॥

**वृत्त भुजंगप्रयात.**

तशा ब्रह्मदंडे जरी भस्म झाले । तरी जान्हवीनें चि ते मुक्त केले ॥
अशी कोण अन्या कृपा पूर्ण आहे । महापापियां जी करी मुक्त पाहें ॥३३०॥
पुढें धांवली स्वामिभेटीस बा ती । मिठी कंठिं घालावया काय जाती ॥
करोनी जगा पूत माहात्म्य ती तें । सहस्रानने वर्णि प्रेमें पतीतें ॥ ३३१ ॥

**वृत्त मालिनी.**

जलनिधिनृपतीची जान्हवी पट्टराणी ।
पसरुनि जणु भेटी घे असंख्यात पाणी ॥
जननिजनक घेतां भेटिला हर्ष झाला ।
सुरमुनिगण सारे टाकिती पुष्पमाळा ॥ ३३२ ॥

**वृत्त शार्दूलविक्रीडित.**

आली सागरसन्निधी विरहिणी स्त्री ती जशी प्रेमळा ।
चुंबाया पतितें सहस्रवदना झाली गमे बा मला ॥
होतां भेट तरंगपंक्ति मिळती त्या एकमेकींमधें ।
गंगासागर यापरी विधि तयां पाहोनि हर्षे वंदे ॥ ३३३ ॥

अनुक्रमणिका

त्रैलोक्यांतिल तीर्थवृंद अवघा पापें जनांचीं हरी ॥
गंगासागरिं आत्मशुद्धि करितां येवोनि स्नाना करी ॥
यातायात कशास तीर्थ गमनीं हें मूळ पर्वी मिळे ।
स्नाना जाति अनंतकोटि वसती स्वर्गी तयांचीं कुळें ॥ ३३४ ॥
गंगेचा महिमा यथामति तुला सांगीतला राघवा ।
जो नित्य श्रवणा करील पठणा जाणोनि तद्वैभवा ॥
भोगी भोग कलत्रपुत्रसह तो पावोनि संपत्तिला ।
अंतीं मोक्षपदासि जाय सुकृती सर्वांपरीं वंदिला ॥ ३३५ ॥
प्रज्ञानिर्मळता निरोगतनुता स्त्री सूज्ञ विद्युल्लता ।
लक्ष्मीनिश्चलता सुपुत्रफलता सर्वत्र सन्मान्यता ॥
आयुष्यस्थिरता यशप्रचुरता आत्मानुसंधानता ।
दे हें गांगचरित्र नित्य पठतां अंतीं जना मोक्षता ॥ ३३६ ॥

**वृत्त उपजाति.**

पावोनियां दुर्लभ जन्म बा हें । प्रत्यक्ष या देविस जो न पाहे ॥
जन्मासि येवोनि निरर्थ झाला । गंगेविणें तारिल कोण याला ॥ ३३७ ॥
तांबूलचूर्णांतुनि अंतकाळीं । वेश्या मुखें विप्रमुखांत घाली ॥
गंगा तयानें चि विमानिं त्याला । घालोनि देवीं स्वपदासि नेला ॥ ३३८ ॥
असोत जंतू जलिं राहती ते । तरू हि काष्ठें वरि वाहती तें ॥
जे स्पर्शिले दुर्बळ गांग वातें । मीं देखिले नंदनि धन्य गा ते ॥ ३३९ ॥
ज्या शक्ति गंगेसि न जावयाला । सुदूरपूर्णत्व हि ये वयाला ॥
गंगा असें नांव जरी मुखाला । अंतीं हि ये स्वर्गनिवास त्याला ॥ ३४० ॥

**वृत्त वसंततिलका.**

ऐकोनि गांग महिमा अति हर्ष झाला । रामासि सानुज करीं अवगाहनाला ॥
प्रार्थी स्तवोनि कर जोडुनि एक भावें । माते सदैव वदनीं तव नाम यावें॥३४१॥
गंगास्तवें अतिबळी रघुराज झाला ।जावोनि राक्षस वधी मुनिच्या मखाला ॥
पावे पुढें जनकनंदिनिरत्नमाळा । येवोनियां पितृपदीं मग ठेवि भाळा॥३४२॥

**वृत्त उपजाति.**

गंगाचरित्रांकितरत्नमाला । करोनि मी अर्पिलि सज्जनांला ॥
असे तयां ही च विनंति माझी । कंठीं धरायासि असोत राजी ॥ ३४३ ॥

**वृत्त मालिनी.**

नरहरिकृतगंगारत्नमाला सुगाथा ।
नरकृतकलुषातें जी हरी कंठिं घेतां ॥

अनुक्रमणिका

त्रिविधपरम तापें जाहला ताप ज्याला ।
निववुनि परितापा शांति दे हे चि त्याला ॥ २४४ ॥
इति नरहरिसूरिविरचितं भागीरथीचरित्रवर्णनं ।

समाप्त.

---

बाळकृष्ण विरचित

## महावाक्यार्थसार.

### श्लोक.

मी आहें अथवा नसें म्हणवुनी संदेह कोणा नसे ।
झाला यद्यपि तो हि संशय पहा शोधोनि जेणें दिसे ॥
तो कालत्रितयीं अबाधित असे सद्रूप ऐशा रिती ।
छांदोग्य श्रुति बोलती उघड ही सद्रूप आत्मस्थिति ॥ १ ॥
जेधीं वृत्तिलयोदयस्थिति जशी जो भासता आसती ।
तैसे बाह्य पदार्थ इंद्रियगणा ज्याच्या प्रभे दीसती ॥
अग्नी सोम रवी प्रकाश मिरवी ज्या स्वप्रभा घेउन ।
सांगे स्पष्ट गुरु श्रुति स्मृति तसें चिद्रूप तो आपण ॥ २ ॥
जो आनंद गमे सदैव विषयीं तो आत्मयाच्या गुणें ।
आत्मीं आत्मपणें चि निर्विषयकीं आनंद तो निर्गुणें ॥
तो आनंद निजस्वरूप म्हणुनी सच्चित्सुखत्वें श्रुती ।
एवं लक्षण आपणा विधिमुखें ब्रह्मत्व ते दाविती ॥ ३ ॥

सत्ता प्रकाश सुखरूपचि ब्रह्म आहे ।
ते शब्द भिन्न परि वस्तु न भिन्न पाहें ॥
तस्मात अखंड रस आपण जाण बा हें ।
वेदें विशुद्ध सकलाश्रय स्वस्थ राहें ॥ ४ ॥

सत्तारूप नसोनि जी प्रकृतिसद्ब्रह्मा श्रयें भासली ।
सत्यत्वें अबुधा जिणें निजबळें आवर्णता दाविली ॥
रज्जुव्याल जसा नसोनि दिसतो किंवा मयूखीं जळ ।
तैसा भास नसूनियां दिसतसे अज्ञान हें चीं मुळ ॥ ५ ॥
सद्रूपात्मपणा धरूनि मिरवी ब्रह्माश्रयें जी भली ।
ब्रह्मा विश्वनिमित्त कारण अशी सोपाधिता दीधली ॥
तीचें सत्वरजस्तमात्मक असें त्रैगुण्य त्यापासुनी ।
जों भूतेंद्रियदेव सर्व उपजे विक्षेप जाणा मनीं ॥ ६ ॥

भूतें सर्व तमोगुणें प्रसवली जो सूक्ष्म ही मागुती ।
ती पंचीकरणें करी निमिळता स्थूलाकृती भासती ॥
तेथें भाव अनेक जो धरितसे तो जीव नांवें असे ।
जो एकत्व धरी समष्टि म्हणुनी तो ईश नांवें वसे ॥ ७ ॥
अधिष्ठान घेऊनि तादात्म्ययासी । अयः पिंड अग्नीसुदृष्टांत त्यासी ॥
अतां वाच्यलक्षांश फोडोनि दावूं । सुखें ब्रह्मजीवैक्य जाणूनि राहूं ॥८॥
मायोपाधि जगासि मूळ असुनी सर्वज्ञ पारोक्ष्यसा ।
अंतर्यामि समस्त विश्व स्रजुनी जो कां नियंता तसा ॥
एक ब्रह्म असोनि ईश्वर असा वाच्यांश हा तत्पदीं ।
एथें ब्रह्म करोनि भिन्न पहतां लक्ष्यार्थ येतो त्वदीं ॥ ९ ॥
स्थूलांतःकरणाद्युपाधि धरिता अज्ञापरोक्षत्व जें ।
जीवात्मैक्य करोनि त्वपदिं तदा वाच्यार्थ हा जाणिजे ॥
ते अंतःकरणादि त्याग करितां लक्ष्यार्थसे बोलती ॥
यासी त्वत्पदलक्षणा करुनियां एकार्थ दावी श्रुती ॥ १० ॥
जीवेशैक्य असेनियां तिळभरी भिन्नत्व पाहे जरी ।
मूढत्वें नरजन्ममृत्युभय हें संसारिं पावे तरी ॥
यालागीं मनिं भिन्नतेसि न धरा वेदार्थ गर्जे चि हा ।
एकत्वीं गमल्या विरोध सुसुखें या लक्षणेनें पहा ॥ ११ ॥
गंगेवरी घोष म्हणोनि जेथें । ये वाक्य कीजे मग लक्षणेतें ॥
प्रवाह सोडोनि तटासि घेतां । वाक्यार्थ येतो सकळासि हाता ॥ १२ ॥
जाणा तुम्ही कीं जहल्लक्षणा हे । मुख्यार्थाचा त्याग हा जींत आहे ॥
वाक्यार्थैक्यीं लक्षणा ही घडेना । लक्षत्यागें मेळ कांहीं पडेना ॥ १३ ॥
कोणी बोले पांढरा धांवताहे ! येथें घोडा घेतला जात आहे ॥
सर्वांशाचा त्याग जींमाजि नाहीं । जाणा तुम्ही आजहल्लक्षणा ही ॥ १४ ॥
ही ही येथें लक्षणा संभवेना । भागत्यागें तीसरी योग्य जाणा ॥
वाच्यत्यागें तत्त्वमस्यादिलक्ष्यीं । ब्रह्मोद्बोधें ईशजीवैक्य रक्षीं ॥ १५ ॥
गृहस्थ कोणी पहिला बघावा । तो जाउनी मागुति दूर गांवा ॥
मुंडूनि डोई परतोनि येतां । बसे स्मृतीला पहिल्या हि गोता ॥ १६ ॥
दोन देश दोन वेष दोन काळ टाकितां ।
पिंड एक या परी कळोनि ये च तत्वता ॥
या परी च ईश जीव गा उपाधि सारिली ।
अहं ब्रह्म एक ही च स्वानुभूति राहिली ॥ १७ ॥

अनुक्रमणिका

| अनुक्रमांक | ग्रंथाचें नांव. | | कि॰ | | ट॰ हां॰ | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | रुपये. | आ॰. | आ॰ | पै. |

### संस्कृत ग्रंथ.

| अनुक्रमांक | ग्रंथाचें नांव | रुपये | आ॰ | आ॰ | पै. |
|---|---|---|---|---|---|
| ६ | कालेय कुतुहलम् नाम प्रहसन * ... ... | ० | ५ | ० | ६ |
| ७ | शिवकाव्य पूर्वार्द्ध–पुरुषोत्तम पंडितकृत ... ... | १ | ८ | २ | ० |
| ८ | पंत विठ्ठल कविकृत–सुश्लोक लाघव. ... ... | १ | ५ | १ | ६ |
| ९ | युवराज कविकृत–रामकाव्य. ... ... ... | १ | ० | १ | ६ |
| १० | वेदांत केसरी–शंकराचार्यकृत ... ... ... ... | ० | ८ | १ | ० |
| ११ | शिवकाव्य उत्तरार्द्धम्-पुरुषोत्तम पंडित कविकृत ... | १ | ५ | १ | ० |
| १२ | पंत विठ्ठलकविकृत गजेन्द्रचंपू ... ... ... ... ... | ० | ८ | १ | ६ |
| १३ | लघुकाव्यानि–अनेककविकृत प्रकरणें ... ... ... ... | २ | ० | २ | ६ |
| | राजव्यवहार कोश ... ... ... ... ... | ० | ३ | ० | ६ |
| | अमरु शतक ... ... ... ... ... | ० | ६ | ० | ६ |
| | पुष्पबाण विलास ... ... ... ... ... | ० | १॥ | ० | ६ |

ज्यांच्या नांवावर * अशी फुली केली आहे तीं प्रकरणें सुटीं आहेत, बांधिलेलीं नाहींत, बांधून पाहिजे असल्यास त्याबद्दल खर्च ८१ आणा निराळा पडेल.

## पोंच.

### सन १८८४ ते १८८७ पैकीं.

| | रु॰ आ॰. | | रु॰ आ॰. |
|---|---|---|---|
| राव॰ सा॰ नी॰ ना॰ भट ... ... | ४–६ | रा॰ रा॰ से॰ ने॰ ला॰ मुरुड... | ८–१२ |
| ,, ,, वि॰ ना॰ फाटक ... | ४–६ | ,, ,, रायसिंहराव नारायण ... | १० |
| रा॰ रा॰ वि॰ कृ॰ भाटवडेकर ... | ४–६ | ,, ,, अं॰ चिं॰ दामले ... ... | ०–६ |
| ,, ,, के॰ म॰ कावळे ... ... | ४–६ | ,, ,, पु॰ ना॰ दातार ... ... | ४ |
| ,, ,, से॰ ने॰ ला॰ धार ... | ८ | ,, ,, ना॰ बा॰ कानीटकर ... | ४ |
| ,, ,, ज॰ मो॰ पिंगळे ...... | ४–१४ | | |

### सन १८८८ पैकीं.

| | | | |
|---|---|---|---|
| श्री॰ रा॰ गो॰ ग॰ किबे ... ... | ४–६ | रा॰ रा॰ से॰ बाजार ला॰ सोलापूर. | ४–६ |
| राव सा॰ श्री॰ ना॰ भट ... ... | ४–६ | ,, ,, से॰ ने॰ ला॰ एलीचपूर... | ४–६ |
| ,, ,, बापूसाहेब आठले... ... | ४ | ,, ,, से॰ ने॰ ला॰ सातारा... | ४–६ |
| ,, ,, गो॰ वि॰ कारभारी धार. | ४–६ | ,, ,, ,, ,, ला॰ पर्लस्पें ... | ४–६ |
| रा॰ रा॰ वि॰ कृ॰ भाटवडेकर ... | ४–१ | ,, ,, अं॰ चिं॰ दामले ... ... | ४–६ |
| ,, ,, द॰ ब॰ गोखले ... ... | २ | ,, ,, ग॰ म॰ ठेले ... ... | ४ |
| ,, ,, भा॰ स॰ पानवलकर ... | ४–६ | ,, ,, से॰ ने॰ ज॰ ला॰ मुंबई. | ४–६ |
| ,, ,, दि॰ कृ॰ पराडकर ... | ४–६ | ,, ,, से॰ बांबे रायल एसियाटीक सोसायटी मुंबई. ... ... | ४–६ |
| ,, ,, से॰ ने॰ ला॰ मुरुड ... | ४–२ | | |

# सूचना.

(१.) सन १८७८ पासून तों सन १८८७ अखेर पर्यंत ज्यांस अंक पाहिजे असतील त्यांणीं दर सालचे १२ अंकांस ५ रु० ५ आणे प्रमाणें आम्हांकडे किंमत पाठविली असतां त्यांजकडे रवाना होतील. फुटकळ अंकास ८८६ प्रमाणें पाठविले असतां अंक रवाना होतील.

(२.) वर्गणी खालीं लिहिलेले गृहस्थांकडे पाठविली असतां आम्हांस पोंचेल.

रा. रा. श्रीधर गणेश जिन्सीवाले एम. ए. प्रोफेसर ....मुंबई.

" " कृष्णाजी महादेव जोगळेकर एम. ए. हेडमास्तर हायस्कूल.........................बडोदा.

" " जनार्दन बाळाजी मोडक बी. ए. हायस्कूल ....ठाणें.

" " सावळाराम माधव नायब सायेर .... .. .. .... इंदूर.

" " अनंत रामचंद्र चांफेकर अ० मा० सिटिस्कूल. नागपूर.

" " वामन दाजी ओक असि० मा० .........संबळपूर.

" " रामचंद्र रघुनाथ नातू अ० मा० हायस्कूल..बेळगांव.

" " गंगाधर पांडुरंग गद्रे अ० मा० हायस्कूल, कोल्हापूर.

" " परशुराम भिकाजी भाटये वकील .........रत्नागिरी.

" " विष्णु मोरेश्वर महाजनी, एम. ए. .......उमरावती.

" " अण्णाजी रामचंद्र आत्रे हे० मा० हायस्कूल,....मिरज.

" " गोविंद रामचंद्र केळकर इंग्लिश मास्तर.........वसई.

(३.) हें पुस्तक सर्वांस घेण्यास सुलभ पडावें म्हणून याची किंमत वर्षास आगाऊ ४ रुपये ट० ह० ८६. मागाहून ५ रुपये ८८. आगाऊची मुदत पुस्तक घेऊं लागल्यापासून दोन महिन्यांचे आंत समजावी. पोष्टाचीं तिकिटें पाठविणें झाल्यास तीं अर्धा आणा किंमतीचीं असावीं व रुपयास ८८६ प्रमाणें वर्तावळा पाठवावा.

(४.) ह्या पुस्तकासंबंधानें पत्रव्यवहार, मनिआर्डरी वगैरेचा करणें तो:-काव्येतिहास-संग्रह व्यवस्थापक ठाणें ह्या पत्त्यावर करावा.

अनुक्रमणिका